


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


मराठी अभ्यास परिषद

अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्नसन, विजया देव, आशा मुंडले

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७ (दूरध्वनी ३३६०६१/२४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** विजया देव, सुप्रिया ६१/१६, एरंडवणे, आयकर भवनासमोरची गल्ली, पुणे ४११ ००४ (दूरध्वनी ३३८८१५)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

संपादक : कल्याण काळे / प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी विजया देव
मुद्रणस्थळ : संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

संपादकीय

# एकेकाने एकेकाला, एखाद्याला

आपल्याकडे यंदाचे वर्ष बालिकांना आणि साक्षरतेला वाहिले गेले आहे. त्यामुळे बालिकांची, स्त्रियांची साक्षरता म्हणजे दुधात साखर. जी भाषा आपण लहानपणी प्रथम शिकतो, ती आपल्याला बोलायला येतच असते. किंबहुना, लहान मूल 'शिकून' भाषा बोलतं, हेच बऱ्याच जणांना माहीत नसतं. आपोआप त्याला बोलता येतं, अशीच सर्व-सामान्य समजूत आहे.

एका प्रसिद्ध फ्रेंच नाटकातला खेडवळ माणूस पुढे पैसा मिळाल्यावर 'प्रतिष्ठित' व्हावं, या हेतूनं एक विद्वान पदरी ठेवतो. तेव्हा त्या पंडिताकडून प्रथमच त्या माणसाला समजतं की, तो जे बोलतो तेच 'गद्य.' पहिल्या भाषेबद्दल हीच स्थिती बहुतेकांची असते.

त्यामुळेच मला वाटतं की, इतर विषयात काम करण्याचा अनुभव आणि ज्ञान असलेले पण भाषा शिकण्याबद्दल विशेष काही माहीत नसलेले अधिकारी लोक बोलून जातात की, प्रत्येकानं कुणाला तरी 'साक्षर' करून टाकावं. ते आपलं राष्ट्रीय कर्तव्य आहे. वगैरे.

पण बोलता सहज आलं, तरी लिहिता सहज येणार नाही. बोलणं आणि लिहिणं यांचे संबंध गुंतागुंतीचे आहेत. आणि 'प्रमाणलेखन' हा भागही त्यात आहेच. अशी एकेकाने एकेकाला शिकवायला हौसेने पुढे येणारी मंडळी मग कंटाळून ते काम मधेच सोडतात. आणि आपल्या अपयशाचे खापर संयुक्त जबाबदारी म्हणून स्वीकारत नाहीत. त्यांना लिहिता येत असतं. ते प्रामाणिकपणे पण तांत्रिक ज्ञानाशिवाय 'शिकवायला' बसतात आणि मग विद्यार्थ्यांवर नाराज होऊन ताशेरे झाडतात.

"या गरिबांना किंवा/आणि खालच्या लोकांना शिकायलाच नको, बुद्धीच त्यांची कमी, ते आळशी असतात." वगैरे वगैरे वगैरे. मलाच 'शिकवता' येत नसेल, असे ते चुकूनही म्हणत नाहीत.

परिणामी शिक्षित आणि निरक्षर या दोघांमधेही साक्षरतेची नावड असलेली आणखी एक जोडी समाजात तयार होते. निरुत्साह संसर्गजन्य आहे. तो या जोडीकडून इतरत्रही तोंडी पसरतो आणि साक्षरताप्रसार मागे पडतो.

मला बरेच दिवस वाटत होतं की, प्रौढ लिहायला शिकतात आणि लहान मुलं लिहायला शिकतात या प्रक्रिया एकसारख्या नाहीत. हा फरक प्रत्यक्ष प्रयोगाने पडताळून पाहाण्याची संधी मला नुकतीच मिळाली. त्यातून बरंच शिकायला मिळालं.

'प्रौढ' कोण? कायद्यानं पाहिलं, तर १४ च्या पुढचा. मात्र शिक्षणाच्या संदर्भात तरी प्रत्यक्षात शाळेत न गेलेले आठ वर्षांपासून पुढचे मूल 'प्रौढ'च ठरते. बोलणे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

म्हणजे आवाज. आणि लिहिणे म्हणजे सपाट पृष्ठभागावर उभ्या, आडव्या, गोल रेघोट्या आणि टिंबे यांचे नाते अगदी लहान मुलांना, सुमारे दीड वर्षापासून ते सहा वर्षांपर्यंत चटकन समजते. कार्डावर शब्द लिहून म्हणून दाखवला, तर मूल कार्ड आणि शब्दोच्चार यांची सांगड पटकन घालतं. लहानपणी 'शिकण्याची' ऊर्मी फार तीव्र असते आणि 'असंच का?' ही शंका येत नाही. 'क' म्हणजे क चा आवाज. ही जोडणी प्रौढाला मनात फार कठीण जाते. चित्र आणि शब्द हे नाते कोणत्याही वयाच्या माणसाला सहज समजते. ते एक प्रकारे जास्त नैसर्गिक आहे. पण कोणतातरी अंदाजे आणि प्रौढाच्या मते तर्कहीन आकृतिबंध म्हणजे फलाणा आवाज, हे त्याला पटत नाही, म्हणून लक्षात ठेवायला, शिकायला अवघड जाते.

शाळेत कधीच गेलं नसलं, तरी पोटाचा व्यवसाय असतोच. ते काम जर हडेलहप्पी स्वरूपाचं असलं आणि बोटांच्या नाजूक हालचाली त्यात कधी कराव्याच लागलेल्या नसल्या, तर पाटीवर, कागदावर लेखणी, पेन्सिल वळवणे फार कठीण जाते. क काढायचा झाला तर प्रौढ 'क'चे चित्र काढायला पाहतो आणि मग रेषेची लांबी कमी जास्त, गोळा लहानमोठा, उघडे अर्धवर्तुळ चुकीच्या दिशेने अशा चुका होत राहतात.

खरोखरच एकेकाने एकेकाला शिकवायचं झालं, तर तो शिकवणारा 'एक' फार तज्ज्ञ हवाच; पण शिकणाराही 'एक' न कंटाळता प्रयत्न करायला काही आमिष दाखवून 'तयार' ठेवायला हवा. वाचायला येण्याचा फायदा सगळी अक्षरे, काना, मात्रा, अनुस्वार आल्यानंतर समजतो. पण त्या आनंदापर्यंत पोचायला ५२ अक्षरे पार करतानाच दमछाक होते. लहान मुलांना ही काळजी नसते. एकूण अक्षरं खूपखूप आहेत, ती हळुहळू येतील, याची त्यांना 'मज्जा' वाटत असते. एक आलं, की ती त्यांना स्वतंत्र सिद्धी वाटते. आई, क आला, म आला अशा ललकाऱ्या ती देत राहतात. प्रौढाला हे शक्य होत नाही. याचा काय उपयोग, असं वाटत राहतं.

स्वतःचे नाव लिहायला त्याला आवडते. नाव म्हणजेच सही हे त्याच्या कानांवर असते. अंगठा नको, सही करू या हे त्याला पटतं. तेवढी प्रगती लवकर होते. मग नाव अर्जुन असो अगर राम. पण पुढे अक्षरांचा कोटा पूर्ण करायची उमेद राहत नाही.

तुम्ही वाचून दाखवा. मी ऐकतो, लक्षात ठेवतो, पाठ म्हणून दाखवतो, अशी मागणी प्रौढ करू लागतात. त्याचे मुख्य कारण म्हणजे सांगितलेली आज्ञा ऐकणे, लक्षात ठेवणे, काम पार पाडणे ही कौशल्ये पोट भरण्यासाठी तोपर्यंत त्याला साध्य झालेली असतात. बालकामगार हा म्हणूनच शिकण्याच्या बाबतीत प्रौढच असतो. पण या त्याच्या कौशल्यांचा उपयोग न करता आपण जर त्याला लिपिचिन्ह आणि ध्वनिचिन्ह यांच्या संकेतावर भर देऊन शिकवत राहिलो— म्हणजेच लहान मुलांना जे सिंबॉलिक असोसिएशनचे, म्हणजेच चिन्हांचा अनुबंध जोडण्याचे कौशल्य असते, ते प्रौढाच्या बाबतीत गृहीत धरायला लागलो, तर सगळी गडबड होऊन जाते. ॲबस्ट्रॅक्ट सिंबॉलिक असोसिएशनचे कौशल्य लहानपणी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

उपजत असते आणि परिस्थितीने शिक्षणाची संधी वेळेवर न मिळाल्याने शिकण्याचेच हे मूलभूत कौशल्य वयानुसार कमी होत जाते. ॲकॅडमिक करीअरमधे ते अनेक वर्षे कमी न होता वाढतेसुद्धा.

पण निरक्षर प्रौढाचे हे कौशल्य कमी झालेले असते.

'ईच वन, टीच वन' हे म्हणून एका प्रौढाच्याच भाषेत सांगायचे तर 'फेल जाते.'

घोषवाक्यांचा हव्यास असणाऱ्या आमच्या समाजाला हे पटले, तर कदाचित एकेकाने एकेकाला कंटाळवून टाकण्याचे प्रयोग थांबतील.

त्याऐवजी योग्य प्रशिक्षण घेतलेली थोडी माणसे अनेकांना दूरचित्रवाणीवरून एकाच वेळी घरच्या घरी वाचायला शिकवू शकतील. त्यांच्या 'प्रौढ' कौशल्यांचा उपयोग करून घेऊन. तशी पद्धत शक्य आहे.

आपले राष्ट्रीय कर्तव्य आहे असे समजून भाषावैज्ञानिक इकडे वळतील का? एका दहा वर्षांच्या प्रौढ मुलीला मी सध्या शिकवते आहे. त्यातून शिकलेले हे सार आपल्या विचारासाठी इथे देते आहे.

ही मुलगी वाचायला शिकली पण श्रम, वेळ, आणि पद्धत यांचा विचार केला, तर हा मार्ग निवडता येणार नाहीच. मी तो प्रयोग म्हणूनच केला.

आशा मुंडले

**सर्वात मोठा शब्द**

वॉशिंग्टन येथील एका स्तंभलेखिकेनं जगातील सर्वात मोठ्या शब्दांविषयी लिहिण्याचं ठरवलं. त्यानुसार ती सामग्रीही जमवू लागली.

या सुमारासच तिच्याकडे काही पत्रं आली. त्यातील दोन पत्रांमध्ये एकमेकांशी स्पर्धा करणारे दोन शब्द आपणच सर्वात मोठे असल्याचा दावा करणारे होते.

आजवर आपल्याला सापडलेला सर्वात मोठा शब्द 'ॲंटीडिसएस्टॅब्लिशमेंटॅरिॲनिझम' हा २८ अक्षरांचा असेल, असं तिला वाटलं. पण या शब्दापेक्षाही मोठा शब्द तिला त्यामागोमाग आलेल्या पत्रातून आढळून आला. हा शब्द ४८ अक्षरांचा होता. तो होता. 'न्यूमोनोअल्ट्रामायक्रोस्कोपिकसिलिकोव्हॉल्कॅनोकॉनिॲसिस' हा शब्द वैद्यकशास्त्रातील असून त्याचा अर्थ सिलिकेटचे कण श्वासोच्छ्वासावाटे आत गेल्यानंतर होणारा फुफ्फुसाचा विकार असा आहे.

दै. सकाळ मधून



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# मराठी शुद्धलेखन : पुनर्विचाराच्या दिशेने

गं. ना. जोगळेकर

## लेखननियमांची परंपरा

मराठी शुद्धलेखनासंबंधी आजवर अनेकदा लिहिले-बोलले गेले आहे. अनेकदा यासंबंधी रणे माजली आहेत, वाद झडले आहेत. शुद्धलेखनसमिती नेमून काही वेळा यातून उपायही सुचविले गेले आहेत. गेली निदान शंभर वर्षे मराठीमधील लेखननियमांचा पुनर्विचार ठरावीक अंतराने होत राहिला आहे. १८९८ ते १९०४ या वर्षांमध्ये या विषयाला प्रथम तोंड फुटले. नंतर १९२८ ते १९३५ या कालावधीत या प्रश्नाचा एक समिती नेमून साकल्याने विचार झाला व लेखननियमांत अनेक बदल केले गेले. त्या बाबतीतही नंतर विचारांची देवाणघेवाण होत राहिली. मराठी साहित्य महामंडळाच्या स्थापनेच्या सुमारास १९५८ मध्ये या प्रश्नाचा पुन्हा खल सुरू झाला, पुन्हा एक समिती नेमण्यात आली आणि या समितीने बनविलेले महामंडळाचे शुद्धलेखनाचे नियम महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनंतर १९६२ मध्ये शासनाकडून स्वीकारले गेले. त्यातही काही किरकोळ बदल नंतर सुचविण्यात आले. पण प्रायः गेली तीस वर्षे महामंडळाचे लेखननियम प्रचारात आहेत.

## लेखनव्यवहारातील शिथिलता

महामंडळाचे हे लेखननियम अस्तित्वात आले खरे, पण त्यांचे सर्वत्र काटेकोरपणे पालन होत आहे, असे म्हणता येत नाही. याबद्दल अगदी अराजक नसले, तरी भरपूर स्वैरपणा अनुभवास येतो. दादोबा पांडुरंग (किंबहुना मेजर कँडी) यांच्या काळापासूनचे, म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धापासून रूढ झालेले जुने नियम निष्ठापूर्वक पाळणारे व चिकाटीने त्यांचा पाठपुरावा करणारे काही अभ्यासक जसे आढळतात तसे, ज्याला जसे वाटेल तसे त्याने लिहावे, लिहिणाऱ्याचा भाव किंवा आशय वाचणाऱ्यास समजला म्हणजे झाले, अशा उदार मनोवृत्तीचेही अनेक जाणकार दिसून येतात. मराठीने सर्वत्र संस्कृतलाच अनुसरले पाहिजे, मराठी लेखननियमांनी हिंदीशी जमवून घेतले पाहिजे, लेखन ही काही मूठभर विद्वानांची मिरासदारी नाही, त्यामुळे नव्याने लिहू-वाचू लागलेल्या बहुसंख्य समाजाला आत्मसात करता येतील असे लेखनाचे नियम साधेसोपे असले पाहिजेत, अशा वेगवेगळ्या भूमिका ठामपणाने मांडणारे अनेकजण आहेत. तर या यंत्रयुगात जगाशी सहज संपर्क साधण्यासाठी 'मराठीसाठी रोमन लिपी हवी' असाही प्रचार चालू आहे. लेखननियमांत सानुनासिक कोकणीपणा नको, पुणेरी पांडित्य नको, वऱ्हाडी वर्चस्व नको, असे प्रादेशिक नकारही नोंदविले गेले आहेत. प्रचलित नियम काय आहेत, याची गंध-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वार्ताही नसलेले हजारो शिक्षक प्राथमिक शाळेपासून विद्यार्थ्यांना लिहायला आणि वाचायला शिकवीत आहेत. कारणापुरते मराठीतून लिहिणारा आणि वृत्तपत्रांपुरते मराठी वाचणारा असा शिक्षितांचा मोठा वर्ग या प्रश्नाबद्दल उदासीन आहे. लेखनाबद्दलची अशी स्वैरता आणि शिथिलता एकंदरीने आपल्या समाजस्थितीला साजेशी अशीच आहे.

## निराशेचे कारण नाही

पण मराठी लेखननियमांचे आता काय होणार, अशी भीती बाळगण्याचेही कारण नाही. या प्रश्नाबद्दल केवळ आस्थाच नव्हे, तर पोटतिडीक असणारेही अनेकजण आहेत. काही जणांचा या प्रश्नाचा चांगला अभ्यास आहे. लेखननियमांत सुसूत्रता असावी, अशा नियमांचे कटाक्षाने पालन करावे, हा प्रश्न मुळापासून समजून घ्यावा, अशा विचाराचे कितीतरी मराठीप्रेमी आजही आहेत. वृत्तपत्रीय व ग्रंथगत मुद्रण, नियमांनुसार अचूक करावे यासाठी साक्षेप बाळगणारे काही प्रकाशक, मुद्रक व मुख्यतः अनुभवी मुद्रितशोधक आहेत. अनेक जागरूक वाचक वृत्तपत्रांमधून नियमबाह्य लेखनाबद्दल प्रतिक्रिया नोंदवत असतात. तेव्हा अज्ञान आणि उदासीनता मोठ्या प्रमाणात दिसत असली, तरी परिस्थिती अगदी हाताबाहेर गेली आहे, असे म्हणता येणार नाही. ( मराठी साहित्य महामंडळाच्या शुद्धलेखन-पुनर्विचारासंबंधीच्या आवाहनाला महाराष्ट्राच्या सर्व भागांतून आणि समाजाच्या सर्व स्तरांतून जो प्रतिसाद मिळत आहे, तो निश्चितच उत्साहवर्धक आहे. )

## भाषा आणि लेखन

लेखननियमांचा पुनर्विचार करताना भाषा व लेखन यांसंबंधीच्या काही मूलभूत गोष्टींचे भान ठेवले पाहिजे. बोलणे आणि लिहिणे ही भाषेची दोन रूपे खरी; पण त्यांच्या प्रकृतिधर्मांत बरेच अंतर असते. ‘ भाषा ’ म्हणजे वस्तुतः ‘ बोलणे ’च. ‘ बोलण्याची भाषा ’ ही तशी द्विरुक्तीच पण लेखनाच्या तुलनेसाठी हा शब्दप्रयोग करावा लागतो. बोलणे ही स्वाभाविक क्रिया असते तर लिहिणे ही मुद्दाम कृत्रिमपणे करावी लागणारी कृती होय. अर्थात बोलण्याच्या क्रियेत पूर्वविचार करणे, अनुरूप ध्वनिसंकेत शोधणे, ऐकणाऱ्या व्यक्तीशी ‘ संवाद ’ होऊ शकेल, अशा पद्धतीने आविष्कार करणे हे सर्व गृहीत असते. बोलणाऱ्याच्या मनातला भाव ऐकणाऱ्याच्या मनात उमटला, आणि बोलणाऱ्याच्या आशयाचे ऐकणाऱ्याला आकलन झाले, म्हणजे बोलण्याची क्रिया पूर्ण झाली, असे म्हणता येते. बोलणे व्यक्तिगणिक वेगळे असते. बोलणाऱ्याच्या शारीरिक, बौद्धिक, मानसिक, सामाजिक आणि सांस्कृतिक स्थितीवर त्याचे बोलणे अवलंबून असते. असाच भेद प्रत्येकाच्या ऐकण्याच्या आणि आकलनाच्या क्षमतेच्या बाबतीतही असतो. बोलण्याच्या भाषेत अशी व्यक्तिविशिष्टता असली तरी तिच्यात त्याच वेळी सर्वसमावेशकता असल्यामुळे सर्व समाजाची भाषा एक असते. तसेच, कोणतीही भाषा एकाच वेळी अनौपचारिक



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आणि औपचारिक अशा दोन स्तरांवर वावरत असते. कोणत्याही उच्चारणाचा 'ध्वनी' हा मूळ घटक असला तरी बोलण्याचा घटक मात्र 'सार्थ शब्द' हा असतो. पण नुसता एखादा शब्द उच्चारणे म्हणजे बोलणे नव्हे. बोलण्यात विशिष्ट आशय व्यक्त करण्यासाठी शब्दसमूहाची क्रमयुक्त आणि सुसंगत तसेच अर्थपूर्ण मांडणी करावी लागते. एवढ्यानेही भागत नाही. बोलण्याची क्रिया जिवंत आणि परिणामकारक होण्यासाठी शब्दांमध्ये (आणि एकाच शब्दाच्या अवयवांमध्ये) स्वाभाविकपणे विराम घेतला जातो. स्वरांचा चढउतार, स्वरांवरील आघात आणि आंदोलने, हेल या साऱ्यांसकट बोलणे प्रकट होत असते. हसणे, रडणे, ओरडणे, किंचाळणे, कण्हणे, दरडावणे, वेडावणे, खिदळणे यांसारख्या क्रियांमधल्या कितीतरी ध्वनींचा (किंवा उद्गारांचा) पूरक उपयोग बोलताना होत असतो. बोलताना डोळे, मान, मुद्रा, हात इ. शरीरघटकांचा परिणामकारकतेसाठी आणि लकब म्हणून उपयोग होत असतो, तो वेगळाच. आणि अशी ही बोलण्याची भाषा अनेक कारणांमुळे बदलत असते. परिवर्तनशीलता हाच तिचा नित्य स्वभाव असतो.

## लेखनाचे परावलंबित्व

आता अशा या चैतन्ययुक्त बोलण्याच्या भाषेला लेखनरूप देणे ही एक अत्यंत दुर्घट गोष्ट आहे. लिहिणे ही मुद्दाम ठरवून केलेली कृत्रिम कृती आहे. त्या त्या क्षणापुरते असणारे बोलणे दीर्घकाळ टिकवून ठेवावे, नंतरच्या पिढ्यांना ते उपलब्ध करून द्यावे, केवळ स्मरणावर अवलंबून राहावे लागू नये, समाजनियमनाचे सातत्य राहावे, अशा अनेक कारणांसाठी माणसाला लेखनाचा उपयोग केला पाहिजे असे वाटते. ध्वनिसंकेताला (म्हणजे बोलण्याला) दृश्यसंकेतात (म्हणजे लिहिण्यात) रूपांतरित करीत असताना, पाऱ्यासारख्या चंचल आणि वाऱ्यासारख्या गतिशील अवस्थेला स्थिर आणि बद्ध करण्याचा खटाटोप करावा लागतो. चंचलता आणि स्थिरता या परस्परविरोधी वृत्ती एकत्र असूच शकत नाहीत. त्यामुळे बोलण्याच्या भाषेला शक्य तितक्या अधिक प्रमाणात लेखनक्रिया ही अनुसरत असते. असे अनुसरणे शंभर टक्के कधीच साध्य होत नाही. कारण लिहिणे सर्व बाबतींत परावलंबी असते. मुख्यतः ते लिपीवर अवलंबून असते. प्रत्येक लिपीचे काही गुणविशेष असतात, तशा तिच्या अनेक मर्यादाही असतात. त्यामुळे बोलण्यातली गतिशीलता आणि लेखनातली स्थिरता यांमध्ये सतत तडजोड करीत लिपीचा स्वीकार व तिच्यातील व्यवहार करावा लागतो. लिपीत कालानुरूप थोडाफार बदल स्वीकारला जातो. (उदा. ॲ, ऑ, या स्वरांसाठी ॅ हे स्वीकारलेले चिन्ह, इंग्रजीच्या संपर्कामुळे बहुतेक भारतीय लिप्यांनी स्वीकारलेली विरामचिन्हे इ.) मुद्रण, टंकलेखन यांसारख्या यांत्रिक सोयींमुळे लेखनाची सुकरता वाढू शकते. पण त्यासाठी आणखी काही वेगळ्या तडजोडी कराव्या लागतात. लिपीने गरजेपोटी काही बदल स्वीकारले, तरी तिची प्रवृत्ती बव्हंशी न बदलण्याची असते. कुणी त्यात बदल सुचविले तरी ते बहुधा त्याच्यापुरतेच राहतात.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

( सावरकर, विनोबा यांचे देवनागरी सुधारणेचे प्रयत्न शेवटी निष्फळच ठरले ! ) तेव्हा बोललेल्या भाषेशी पदोपदी तडजोड करीत तिला दृश्य रूप देण्याचा केलेला प्रयत्न म्हणजे लेखन. हा प्रयत्न शेवटी अपुराच राहतो, कारण कोणतीही लिपी परिपूर्ण अशी असत नाही.

## सार्थ वाचन

पण नुसते लिहिणे पुरेसे नाही. लिहिणे ही अर्धीच क्रिया झाली. जे लिपिबद्ध केले आहे, त्याचे पुन्हा ध्वनिसंकेतात रूपांतर ( म्हणजे 'वाचन') करता आले पाहिजे. आणि हे वाचन तरी कसे ? 'लिहिल्याबरहुकूम' नव्हे, अपेक्षित अशा 'बोलण्याबरहुकूम !' ( असे वाचन फार थोड्यांना जमते, म्हणून तर वाचन ही कला ठरते. ) भाषेच्या स्थिर आणि दृश्य रूपाकडून पुन्हा चल आणि श्राव्य रूपाकडे जाणे म्हणजे वाचन. असे वाचन करण्याची क्रिया चालू असतानाच बोलण्यातल्या अनुस्यूत अशा अर्थाकडे जाता आले पाहिजे. तरच वाचनाची क्रिया सार्थ झाली, असे म्हणता येईल. आता हे सगळे सरावाने, परिश्रमाने आत्मसात करता येते, हे खरे, पण तरीही त्यात चकण्याची अनेक ठिकाणे असतात.

## लेखननियमांत परिवर्तन अटळ

लिपीची योजना आणि लेखन ही कृत्रिम गोष्ट खरी, पण आधुनिक जगात लेखनावाचून भागत नाही, हेही तितकेच खरे. शिक्षणप्रसाराबरोबर लेखनव्यवहार वाढणार, हे उघड आहे. कारण शिक्षणाचा भर तोंडीपेक्षा लेखीवरच जास्त असतो. साक्षरता वाढल्याने जीवनव्यवहार अधिक सुकर बनतो. विशेषतः शासनव्यवहार, न्याययंत्रणा, उद्योगव्यापार, शिक्षण, प्रसारमाध्यमे, ग्रंथव्यवहार यांमध्ये सतत लेखनाचा आश्रय घ्यावा लागतो. लेखनामुळे सर्व स्तरांतला मानवी व्यवहार अधिक नियमित व सुव्यवस्थित होत असतो, यात शंका नाही. हे सगळे साध्य होण्यासाठी लेखनाचे नियम सिद्ध केले पाहिजेत, त्यांचे सार्वत्रिक पालन केले पाहिजे, अशी जाणीव आवश्यक असते. समाजाच्या हितासाठी जसे कायदे करावे लागतात आणि त्यांचे निष्ठेने पालन करावे लागते, तसेच लेखननियमांचे आहे. बदलते मानवी जीवन, बदलत्या आकांक्षा आणि गरजा यांना अनुसरून नवनवीन कायदे करावे लागतात आणि असलेल्या कायद्यांत सुधारणा करावी लागते, तरच समाजमनाचे प्रतिबिंब त्यात पडू शकते. ( काही दशकांपूर्वी गर्भपात हा दंडनीय अपराध होता, तर आता त्यास कायद्याची मान्यता मिळू शकते. ) कुठल्याही समाजाचे कायदे काही थोड्या कायदेपंडितांकडूनच केले जातात, पण त्यासाठी 'व्यापक समाजहित' हे तत्त्व केव्हाही दृष्टीआड करून चालत नाही. तीच गोष्ट लेखननियमांची आहे. लेखनाचे नियम या क्षेत्रातले विद्वानच ठरविणार, त्यात वेळोवेळी बदलही तेच सुचविणार, पण असे करताना



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

‘ आम्ही म्हणू, तेच प्रमाण ’ हा आग्रह व्यर्थ ठरतो. ‘ लेखननियम कुणासाठी आणि कशासाठी ’ याचे भान अशा पंडितांनी ठेवणे आवश्यक आहे. खरी अडचण इथेच आहे. सवयीमुळे जे अंगवळणी पडलेले असते, ते कितीही कालबाह्य असले, तरी तेच तेवढे योग्य अशी अनेकांची मनोधारणा झालेली असते. याउलट (प्रत्येक नवा शिक्षणमंत्री शिक्षणाच्या बाबतीत घोषणा करीत असतो, त्याप्रमाणे) अनेकांना लेखननियमांत ‘ आमूलाग्र बदल ’ करण्याची घाई झालेली असते. वस्तुतः समाजमनाला आकस्मिक आणि लादलेले बदल नको असतात, पण त्याला बदलच नको असतात असे मात्र नाही. बदल किंवा सुधारणा करण्यात आपले हित आहे याची जाणीव झाली तर, असे बदल समाजाच्या पचनीही पडू शकतात. तेव्हा विद्वानांनी या बाबतीत तारतम्य राखले पाहिजे हे उघड आहे.

## लेखनाबद्दलच्या भिन्न भूमिका

बोलण्याच्या भाषेचे औपचारिक आणि प्रमाण रूप लेखनदृष्ट्या अधिक सोयीचे असते. दैनंदिन जीवनात आपण अनौपचारिकरीत्या जसे बोलतो, तसे अगदी लिहिताच येणार नाही, असे नाही. काही वेगळे संकेत योजून तसे लिहिता येईल, पण तरीही काही त्रुटी राहतीलच. (हसण्याचा ध्वनी लिहिण्यासाठी ‘ हाः हाः हाः ’ किंवा ‘ ह्यः ह्यः ह्यः ’ असे लेखन पुष्कळदा केले जाते. पण प्रत्यक्ष हसताना आपण वेगळाच ध्वनी उच्चारत असतो. चुकलो किंवा अरेरे या अर्थी ‘ च् च् ’ असे लिहिले, तरी खरा उद्गार वेगळाच असतो.) ललित लेखनात विशिष्ट परिणामासाठी भाषेचे बोलीरूप स्वीकारावे, असा आग्रह धरला, तरी इतर आविष्कारासाठी प्रमाणरूपच स्वीकारणे इष्ट ठरते. भाषेचे प्रमाण उच्चारण, भाषेची नियमव्यवस्था (म्हणजे व्याकरण) या गोष्टींप्रमाणे भाषापरंपरा, भाषेची पूर्वरूपे, कोशरचना हेही लेखनाचे नियत घटक असले पाहिजेत, अशी काही जणांची भूमिका असते. त्यातच अनेक भाषांसाठी जेव्हा एकच लिपी वापरली जात असते, आणि अशा सर्व भाषांमध्ये लेखन करण्यासाठी समान नियम असावेत, असा आग्रह धरला जातो, तेव्हा लेखनाचा प्रश्न अधिकाधिक गुंतागुंतीचा होत जातो. अनेक भाषांसाठी एक लिपी ही स्थिती पुष्कळदा आढळते. (उदा. संस्कृत, हिन्दी आणि मराठीसाठी देवनागरी लिपी प्रचारात आहे. अलीकडे उर्दूसाठीही देवनागरी वापरलेली आढळते आणि सिंधीसाठीही देवनागरी हा एक पर्याय आहे. बहुतेक युरोपीय भाषांसाठी रोमन लिपी तर मध्यपूर्वेतील अनेक भाषांसाठी अरेबिक लिपी योजली जाते.) याउलट, एकाच भाषेसाठी अनेक लिप्यांचा वापर केला जात असतो. मराठीसाठी देवनागरीपेक्षा मोडी लिपी अधिक प्रचारात होती. आणि फादर स्टीफन्सचा क्रिस्तपुराण हा ग्रंथ सतराव्या शतकात छापला गेला, तो रोमन लिपीत !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

## देवनागरी लिपीच्या मर्यादा

मराठीचे लेखन म्हटल्यानंतर आता देवनागरी (किंवा बाळबोध) लिपीच डोळ्यांसमोर येते. विशेषतः, एकोणिसाव्या शतकात मुद्रण सुरू झाले, नियतकालिके अस्तित्वात आली, पाठ्यपुस्तकांचे व इतर ग्रंथांचे प्रकाशन होऊ लागले आणि त्याबरोबर लेखनाचे नियम रूढ होऊ लागले. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी सार्वजनिक शिक्षणाची नुकतीच सुरुवात झाली होती, लेखन-वाचनाचा व्यवहार करणारा शिक्षित वर्ग अगदी मोजका होता त्यामुळे शालेय अवस्थेपासून लेखननियमांबद्दल कटाक्षाने काटेकोर राहणे शक्य झाले. इंग्रजीसाठी वापरली जाणारी रोमन लिपीही तुलनेसाठी समोर असल्यामुळे आणि इंग्रजीच्या लेखन-नियमांतली स्वैर अनियमितता प्रत्येक शब्दागणिक जाणवत असल्यामुळे देवनागरी लिपी अगदी निर्दोष आहे असे मराठी भाषकांना वाटायला लागले. वस्तुतः तसे नाही. देवनागरीच्याही अनेक त्रुटी आहेत, उदा– (१) एकाच अक्षराचे दोन उच्चार- चार (४ ही संख्या), चार (खाऊ घाल); जग (विश्व), जग (जिवंत राहा), (२) लेखन एका प्रकारे, उच्चारण वेगळेच– हंस (हँस), सिंह (सिंव्ह), (३) एकाच उच्चारणासाठी भिन्न पर्याय- ए–अे, 'र' उच्चारणाचे अनेक प्रकारचे लेखन, जोडाक्षरांचे भिन्न प्रकारचे लेखन, (४) महाप्राणयुक्त न, ण, र, ल, व इ. साठी लेखनचिन्ह नसणे, (५) ड, ङ, ड, ङ् इत्यादी लेखनदृष्ट्या निकट पण उच्चारभेद असलेल्या अक्षरांमुळे होणारा गोंधळ– य–थ, घ-ध, म-भ, इ. (६) अनावश्यक अक्षरांचे अस्तित्व– ञ, ऋ, ष, (७) डावी-कडून उजवीकडे असा एकच क्रम न राहता अक्षराला सर्व दिशांनी जोडली जाणारी चिन्हे व त्यामुळे लेखनगतीस पडणारी खीळ इ. देवनागरीच्या आणखीही काही त्रुटी दाखविता येतील. पण हे सर्व सवयीचे झाले असल्याने आहे त्याचे समर्थन करण्याची प्रवृत्ती दिसून येते.

## पुनर्विचार आवश्यक

बोलण्याची भाषा कालानुसार बदलत असते आणि लेखनाने तिचे अनुसरण केले पाहिजे ही भूमिका स्वीकारल्यामुळेच आजवर लेखननियमांत त्या त्या वेळी बदल करण्यात आले. हे अनुसरण कधीच शंभर टक्के होऊ शकत नाही, हे कुणीही मान्य करील, पण आहे ते तसेच कायम ठेवावे हा मात्र दुराग्रहच ठरेल. त्यामुळे महत्त्वाच्या नियमांकडे परिवर्तनाच्या दृष्टीने पुन्हा लक्ष पुरवावे लागते.

## ऱ्हस्व आणि दीर्घ

शुद्धलेखन म्हटले की, आधी आठवतात ते ऱ्हस्व आणि दीर्घ यांबद्दलचे नियम. आज-वरचे हे नियम नेहमीच विवाद्य ठरले आहेत. वस्तुतः ऱ्हस्वत्व आणि दीर्घत्व म्हणजे काय ? तर स्वरोच्चारणासाठी लागणारा कमी किंवा अधिक कालावधी. खरे म्हणजे काला-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

बधीचे मापन केवळ ' ऱ्हस्व-दीर्घात ' करणे चुकीचे आहे. निभृत किंवा तोकडा उच्चार हा सर्वांत कमी कालावधी तर प्लुत म्हणजे दीर्घापेक्षा अधिक लागणारा कालावधी. तेव्हा केवळ ऱ्हस्व-दीर्घाबद्दल नियम करणे अयोग्य ठरते. ऱ्हस्व दीर्घ म्हणताच मुख्य प्रश्न उभा राहतो तो असा की, या भेदामुळे शब्दांच्या अर्थात बदल पडतो का ? त्याचे उत्तर ' नाही ' असेच द्यावे लागेल. यावर सुत–सूत, शिला–शीला असली संस्कृत उदाहरणे हमखास पुढे केली जातात. त्याला उत्तर असे द्यावे लागेल की, मराठीत यांमुळे अर्थभेद निश्चितच निर्माण निर्माण होत नाही. एकतर विशिष्ट जमातवाचक या प्रकारचा ' सूत ' हा शब्द मराठीत प्रचारात नाही. ' धागा ' या अर्थाचा ' सूत ' शब्द आहे. त्याचे अनेकवचन ' सुते ' होते, ' सूते ' नव्हे. प्रत्यय लागतो, तेव्हा सुताने सुताला अशीच रूपे होतात. तीच गोष्ट शीलाची. मराठीत सुशिला म्हटल्याने ते नाव असलेल्या स्त्रीचाच बोध होतो. ' चांगल्या शिळेचा ' मुळीच होत नाही. मराठीत ऱ्हस्व-दीर्घाचा भेद मुळीच स्वनिमिक (भिन्न अर्थ निर्माण करणारा) नाही. तेव्हा ऱ्हस्व-दीर्घ हे प्रकरण मराठीच्या बाबतीत निरर्थक असल्यामुळे ते निकालात काढले पाहिजे.

## ऱ्हस्व दीर्घ हा भेद सर्वच स्वरांचा

ऱ्हस्वदीर्घाबद्दल असे विधान करण्याचे मुख्य कारण असे आहे की, आपल्याला उच्चारणाकडून नंतर लेखनाकडे वळण्याऐवजी लेखनचिन्हांवरून भाषा शिकण्याची कृत्रिम सवय लागली आहे ! ऱ्हस्व आणि दीर्घ इकार-उकारासाठी (संस्कृत भाषेमुळे) वेगळी चिन्हे आहेत. त्यामुळे आपला असा समज होतो की, हे वैशिष्ट्य फक्त इकार-उकाराचेच आहे. आपले बोलणे थोडे तपासले की, यातली चूक लगेच जाणवते. अ-आ पासून ओ–औ पर्यंत कोणताही स्वर असो, त्या सर्वांचा ऱ्हस्व-दीर्घ (आणि प्लुतसुद्धा) उच्चार होतच असतो. सरळ, गडद, दगड, वजन यांतल्या प्रत्येक शब्दामधले ' अ 'चे उच्चारण कमी-अधिक कालावधीचे आहे. वेगळे लेखनचिन्ह नसतानाही आपण ते उच्चारण बरोबर करीत असतो. ' साताऱ्याचा ' मध्ये भिन्न कालावधीचा ' आ ' असूनही वेगळे चिन्ह नाही, म्हणून आपले काही अडत नाही. तेव्हा इ. उ ला एक न्याय आणि इतर स्वरांना दुसरा हा केवळ दृष्टिभ्रम होय. हेमाडपंताने असा भ्रम होऊ न देता मोडीसाठी एकच इकार व एकच उकार ठेवला होता. त्याची ही कृती निश्चितच समंजसपणाची होती. नाहीतरी मराठीत कारणपरत्वे ऱ्हस्व-दीर्घाची उलटाउलट होत असते. (उदा. वीज-विजेचे, सूत-सुनेला इ.) तेव्हा मराठीने देवनागरीतही एकच इकार-उकार स्वीकारला, तर असा काय अनर्थ ओढवणार आहे !

## अनुस्वार

ऱ्हस्व-दीर्घाच्या बरोबरीने अनुस्वाराच्या प्रश्नानेही एके काळी सर्वांना त्रस्त केले होते.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आता मात्र हा प्रश्न बराचसा निकालात निघाल्यासारखा आहे. ज्यांचा स्पष्ट, गुणगुणीत उच्चार होतो, अशांसाठीच फक्त शीर्षबिंदू द्यावा, एवढा साधा नियम स्वीकारला, तर हा प्रश्न उरणारच नाही. पण अजूनही काही जणांना हे पटत नाही. त्यांना परसवर्णाचा विकल्पही हवा असतो. आता वाङ्मय, वाङ्निश्चयच अशा दोन चार शब्दांमध्ये ङ् या परसवर्णाचा उपयोग करावा लागतो हे खरे, पण शङ्कर, शङ्ख, सङ्गती असा सरसकट उपयोग करणे अनावश्यक ठरते. तीच गोष्ट 'ञ'ची. य चे सानुनासिक रूप 'यँ' उपलब्ध असताना या 'ञ'ची मुळातच गरज नाही. आणि व्यञ्जन, चञ्जल, झञ्झावात असे लिहिण्याची मुळीच आवश्यकता नाही. ण्, न्, म्, ही अनुनासिके शब्दात मोठ्या प्रमाणावर योजली जात असतात. त्यांना परसवर्णासाठी वेगळे वापरण्याचे काही कारण नाही. भाण्डण, तण्टा, गुण्टा, पसन्त, पन्थ, छन्द, सन्धी, सम्प, लाम्ब असे लिहिण्याचा खटाटोप करण्याचे काही कारण नाही. सन्मान, सन्मुख, अन्नान्न, फन्ना, सम्मान अशा काही शब्दांमध्ये 'न्', 'म्' या व्यंजनांचे लेखन केले जाते ते काही अनुस्वाराला विकल्प असा परसवर्ण म्हणून नव्हे, तर जोडाक्षर म्हणून ही व्यंजने येथे येतात.

मराठी भाषकांच्या उच्चारणालाच प्रमाण मानून लिहायचे, अन्य कशाला नाही, असे ठरविले, तर ज्या शब्दांत अनुस्वारानंतर श, स, र, ह यांसारखी व्यंजने येतील त्यांचे लेखन अगदी वेगळे करावे लागेल. उदा. हौंस (हंस), सौंशय (संशय), कौंस (कंस), वौंश (वंश), सौंरचना (संरचना). हीच गोष्ट सिंव्ह (सिंह), सौंसार (संसार), सौंहार (संहार) इत्यादी शब्दांची. मुळातल्या सौंस्कृत (संस्कृत) शब्दांचे आता बदललेले उच्चारण सर्रास होत असेल, तर तसे लेखनस्वरूपही स्वीकारण्यास खळखळ का करावी? प्रत्येक भाषक आपल्या विशिष्ट ढंगाने उच्चारण करत असतो हे विसरून चालणार नाही. चाँद, जहाँ, भलीभाँति, हँसी, माँ या शब्दांचे उच्चारण हिन्दी भाषक वेगळे करतात. आणि तसे वेगळे लेखन करतात, म्हणून त्यांची जशी चूक ठरत नाही, तीच गोष्ट मराठी भाषकांची मानली पाहिजे.

## अनुस्वारावर लादलेली कामे

पण अनुस्वाराचा प्रश्न आणखी एका कारणामुळे किचकट ठरला आहे. व्याकरणातले काही घटक लेखनात आणण्यासाठी अनुस्वारावर ती जबाबदारी सोपविण्यात येते. अनेकत्व दाखविण्यास शब्दाच्या सामान्य रूपावर अनुस्वार देणे सध्या प्रचारात आहे. 'मुलांस, मुलांना' यासारख्या बहुतेक शब्दांत सानुनासिक उच्चारण नाही, पण अनेकवचन दर्शविण्यासाठी अनुस्वार दिला पाहिजे, असा नियम आहे. वास्तविक एका मुलाला की, अनेक मुलांना हे प्रत्ययावरून कळू शकते. भाषेत पदोपदी संदर्भाचे साहाय्य घेऊनच आपण बोलत असतो, मग ते तत्त्व लेखनात का नको? उलटा परिणाम असा होतो की लोकान्ना, त्यान्ना असा अपेक्षित नसलेला उच्चार वाचताना लोक करायला लागतात. नाव–नाव,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

पांच-पाच यांसारख्या शब्दांत अर्थभेदासाठी अनुस्वार द्यावा, असे म्हणणारेही काहीजण आढळतात. तुझे नाव काय ? असा प्रश्न कुणाला विचारला आणि त्याच्या मनात मात्र होडीबद्दलची प्रतिक्रिया उमटली, असे कधी झाले आहे काय ? पृच्छादर्शक ' का ' आणि कारकदर्शक ' कां ' असा लेखनात भेद करावा, असे म्हणणाऱ्यांना या ' का 'चा वापर आणखीही काही प्रकारे होत असतो, याची जाणीव बहुधा नसते. ' आता का, आता का ' यात पृच्छाही आहे आणि कारणही आहे ! ' पटतंय का नाही, तुझं तू ठरव ' यातला का किंवा दर्शक आहे. हाच क्रम वाढवत नेला, तर व्युत्पत्तीवरून ठरतो म्हणून द्या अनुस्वार, प्रथमपुरुष दाखविण्यासाठी अनुस्वार, नपुसकलिंगी रूप ( ऊं, पं ) आणि त्यांची अनेकवचने यांचा बोध होण्यासाठी अनुस्वार, तृतीया, सप्तमी या विभक्तींची रूपे दाखविण्यासाठी अनुस्वार अशी ही लांबण लागेल आणि सगळीकडे पुन्हा अनुस्वारांचे साम्राज्य पसरेल. गंमत म्हणजे अनुस्वारयुक्त लेखन असूनही अर्थात फरक पडतो, अशा शब्दांकडे कुणाचे लक्षही जात नाही ! ' खंड ' असे एकच लेखन असूनही अनेक अर्थांचे हे भिन्न शब्द नाहीत काय ? तुकडा, अंतर, शेतसारा, भूभाग या सर्वांसाठी ' खंड ' हा एकच शब्द असूनही आपले अडत नाही ना ? दंड, सांड, गंध, भांग, गंडा यांसारख्या शब्दांतही संदर्भच पाहावा लागतो ना ? एकंदरीने स्पष्ट नासोच्चारासाठी अनुस्वार (शीर्षबिंदू ). बाकी सगळे हेतू अमान्य. हे एकदा पक्के ठरविल्याशिवाय ह्या अनुस्वारप्रकरणाचा गुंता सुटणार नाही.

## लेखनातील एक अलक्षित अंग

मराठी स्वरांचे साघात आणि निराघात उच्चारण हा लेखनदृष्ट्याही विचारात घेण्यासारखा प्रश्न आहे. पण या प्रश्नाकडे आजवरच्या लेखननियमांचे दुर्लक्ष झाले आहे. आपल्या बोलण्यात विशिष्ट शब्दांमध्ये विकल्पाने द्वित्त रूप येत असते. (उदा० आता-आत्ता, सुटी-सुट्टी, झकास-झक्कास इ.) पण हा उच्चारणशैलीचा विशेष म्हणून विचारात नाही घेतला, तरी चालण्यासारखे आहे. स्वराघाताचे तसे नाही. एखाद्या वाक्यातील शब्दांवरचा आघात बदलला, तर अर्थात बदल होतो हे नेहमीच आपण अनुभवत असतो. ( मी थोडं बोलू का !, मग हे आधीच सांगायला काय झालं होतं ? यासारख्या आपल्या नित्याच्या बोलण्यात आघाताच्या जागा बदलूनच आपण आशयाचा वेगळेपणा व्यक्त करीत असतो. ) मात्र याबद्दलही लेखनात काही वेगळी व्यवस्था नसली, तरी वाचकाला अशा आघातांचा अंदाज घेता आला, तर ती एक कौशल्याची बाब ठरेल. ' य 'कार-युक्त स्वराघात मात्र अर्थदृष्ट्या महत्त्वाचा आणि वेगळी चिन्हव्यवस्था नसल्यामुळे गोंधळ निर्माण करणारा ठरतो. ( उदा. कान्याचा- **कान्याचा**, मध्याला- **मध्याला**, पाल्याचा- **पाल्याचा** असत्याचं- **असत्याचं** ) आता अधोरेखा वापरून हा आघात दाखविता येईल, असे कुणी म्हणेल. पण अधोरेखेचा दुसऱ्या कारणासाठीही वापर रूढ आहे. ( उदा. आपली मागणी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

त्वरित नोंदवावी, मागाहून तक्रार चालणार नाही.) तेव्हा 'य'युक्त आघात हा भेदजनक असल्याने त्याची लेखनात वेगळी व्यवस्था केली पाहिजे. महाप्राणाचा (किंवा 'ह' चा) साघात व निराघात असे उच्चार होतात. त्या वेळी त्याचे रूप उच्चारभेद एवढेच असते त्यातून अर्थभेद होताना आढळत नाही. (उदा. कोल्हा– कोल्हा, तुम्ही– तुम्ही, पुन्हा– पुन्हा इ.) (ध्वनिविचाराच्या दृष्टीने अर्थभेदकारक घटक म्हणून महाप्राणत्वाला अतिशय महत्त्व आहे, पण तो स्वतंत्र विषय आहे.) वस्तुतः आपल्या स्वाभाविक बोलण्यात आघात, आंदोलन, हेल, खटका असे अनेक उच्चारणप्रकार एकमेकांत मिसळून येतात. त्यांना लेखनरूप देणे तसे दूरापास्तच. पण जेथे असे उच्चारण अर्थभेदकारक ठरत असते तेथे लेखनात त्याची व्यवस्था लावण्याची गरज आहे. (कोशरचनेपुरता असा त्या त्या शब्दासाठी प्रयत्न डॉ. द. ह. अग्निहोत्री यांनी अलीकडे केला आहे, तो निश्चितच स्वागतार्ह आहे.)

## जोडाक्षरांचे लेखन

एखाद्या व्यंजनाचे पूर्णरूप आणि अर्धरूप हे इतर काही लिप्यांप्रमाणे देवनागरीचे वैशिष्ट्य म्हणता येईल. दोन किंवा क्वचित तीन व्यंजनांचे एकत्रीकरण करणे या लिपीमध्ये सहज शक्य होते, कमी जागेत अधिक ध्वनींचे उच्चारण लिहिण्याचीही सोय यामुळे होते. मात्र या व्यवस्थेत अडचण अशी आहे की, प्रत्येक व्यंजनाचे अर्धरूप आणि ते दुसऱ्या व्यंजनाशी जोडण्याची पद्धती यांत फारच विविधता आहे. हेही एक वेळ समजण्यासारखे आहे. यामध्ये खरा गुंता निर्माण होतो तो विशिष्ट जोडाक्षर (किंवा संयुक्त व्यंजन) लेखनाच्या विविध पद्धती प्रचारात आहेत त्यामुळे. यांतल्या काही पद्धती हस्तलेखनाला तर काही टंकलेखनाला आणि मुद्रणाला सोयीच्या असल्याने कोणती स्वीकारार्ह असा प्रश्न पडतो. मानवी शरीरस्थित लेखनाला प्राधान्य द्यायचे की, यंत्राला (अर्थात मुद्रणाला) याबद्दल बहुधा एकमत होत नाही. यंत्राच्या दृष्टीने एकापुढे एक अक्षरे जोडत जाणे सोयीस्कर ठरते. जेवढ्या कमी मातृका वापरणे शक्य असेल, तेवढे यंत्राला चांगलेच. त्यामुळेच 'क्त' साठी एक, 'क्र' साठी एक अशा जागा अडवून ठेवण्यापेक्षा क्‌तक्‌त, क्‌र्‌ हे लेखन यंत्रानुकूल आहे. यात आणखी एक लाभ असा की, जोडाक्षरातील ध्वनि-क्रमाबद्दल येथे शंकेला जागा राहत नाही. सर्व हे लेखन हस्तलिखितात आधी व, नंतर 'र' (म्हणजे वस्तुतः व्र) असे केले जाते, पण सर्‌व या यंत्रलिखितात हा दोष उरत नाही. पण असे सुटे लेखन केल्यावर त्यांना 'जोडाक्षर' म्हणणे विसंगत ठरते. आणि दुसरे असे की, मुळातील व्यंजन पूर्ण लिहून शिवाय ते अर्धे आहे, हे दाखविण्यासाठी त्याचा पाय मोडायचा, हे हस्तलेखनाच्या दृष्टीने श्रम व वेळ वाढवण्यासारखे आहे. ज्या व्यंजनांमध्ये पूर्ण दंडचिन्हे नाहीत– (उदा– छ, ड, ह, ट, ठ) त्यांचे अर्धरूप पाय मोडून दाखविण्यापेक्षा दुसरा पर्याय उरत नाही. ज्या व्यंजनामधे व्यंजनदर्शक पूर्वरूप



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आणि स्वरदर्शक दंडचिन्ह अशी स्थिती आहे, तेथे कुठली समस्या उरत नाही. दंड काढला, की उरते ते अर्धरूप. उदा० ग-ग्, घ-घ्, च-च्, थ-थ्, झ-झ्, भ-भ्, म-म्, प-प् इत्यादी. र च्या अर्धरूपाचे उपलब्ध अनेक पर्याय; क, फ सारखी मध्यदंडचिन्हाची व्यंजने; ह, द संबंधी असलेला वेगळेपणा आणि मुख्य म्हणजे संस्कृत लेखनपरंपरेपासून सवयीच्या झालेल्या व अंगवळणी पडलेल्या अनेक गोष्टी यांमुळे जोडाक्षरलेखनासाठी अमुक एक तत्त्व अवलंबिता येईल, असे म्हणण्याची सोय नाही. उपलब्ध पर्यायांपैकी त्यांतल्या त्यात कमी त्रासदायक अशी पद्धती हस्तलेखनासाठी आणि मुद्रणसुलभ असा पर्याय यंत्रलेखनासाठी हे यापुढे कमीत कमी दोन विकल्प राहतील असे म्हणता येते. ब्रह्म, चिन्ह, आव्हान, आल्हाद, ऱ्हास ह्या लेखनात ' ह 'कार नंतर व त्याखेरीजचे व्यंजन आधी हा मराठीने स्वीकारलेला पर्याय आता स्वीकारणे शहाणपणाचे ठरते. मुद्दाम ' ह ' च्या पोटात ती ती व्यंजने सामावण्यात काही अर्थ नाही. ब्रम्ह आणि म्हैस यांना मराठीने एकाच पातळीवर आणले, म्हणून काही बिघडत नाही. पण अजून अनेकांना यात 'सुसंस्कृततेचा घोर अपमान' वाटतो, हे खरे.

## संस्कृतचे ऋण व दडपण

मराठीचे देवनागरीतले लेखन काय किंवा एकंदरीने व्याकरण काय याबाबत संस्कृतचे ऋण किती मानायचे आणि त्या भाषेचे ओझे किती वाहायचे, असा प्रश्न नेहमी सतावत राहतो. इतर भारतीय भाषांप्रमाणे संस्कृतचे ऋण मराठीवर आहे यात शंका नाही. आजही परिभाषेसाठी संस्कृत शब्द स्वीकारणे सोयीचे ठरते. असे शब्द पुन्हा पुन्हा वापरल्याने जवळचे वाटू लागतात, हेही खरे आहे. मराठीने संस्कृत परंपरा नाकारलेली नाही, पण काही द्राविड भाषा, अरबी फारसीसारख्या मध्यपूर्वेतल्या भाषा, पोर्तुगीज-इंग्रजीसारख्या युरोपीय भाषा यांचेही अनेक विशेष गेल्या हजारएक वर्षांत मराठीने आत्मसात केले आहेत. पाली, प्राकृत, अपभ्रंश यांचाही मराठीच्या घडणीत वाटा आहे. हे सर्व लक्षात घेतले, तर मराठीने आपल्या स्वतंत्र वाटचालीत ऊठसूठ संस्कृतचे ओझे बाळगण्याचे कारण नाही, असेच कुणीही म्हणेल. शब्दावर अनुस्वार द्यायचा, की नाही यासाठी उच्चारण लक्षात घ्यायचे की, व्युत्पत्तीचा आग्रह धरायचा ? समास होण्याआधी शब्दाचे लेखन एक प्रकारचे आणि सामासिक पदात मात्र वेगळे, हे कशासाठी स्वीकारायचे ? संस्कृतमध्ये तसे आहे म्हणून ? लेखननियमांच्या बाबतीत तर असे अनेकदा वाटल्यावाचून राहत नाही की, उडिया-तेलुगु-कन्नडसारखी मराठीची स्वतंत्र लिपी असती, तर येताजाता संस्कृतचे दडपण आले नसते. संस्कृतशी अगदी मिळतेजुळते घ्यायचे असे हिन्दी भाषकांनी ठरविले असेल. पण मराठीनेही तेच धोरण स्वीकारले पाहिजे हा आग्रह कशासाठी ? हिंदी भाषकांनी काही बाबतींत स्वतःचे वेगळेपण राखले आहे, हे विसरून चालणार नाही. उच्चारानुसार अनेक हिंदी शब्दांमध्ये त्या त्या अक्षराखाली नुक्ता देण्याची



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

पद्धती आहे. नाम, विशेषणे इत्यादींचे विभक्ती-प्रत्यय सुटे उच्चारण्याचा व तसेच लिहिण्याचा हिंदीचा रिवाज आहे. मात्र हा नियम सर्वनामांना लागू नाही. प्रत्यय लागताना सामान्यरूप होणे आणि न होणे याबाबतीत हिंदीत पुष्कळ अपवाद आहेत. कुठल्या भाषेतला शब्द हिंदीत स्वीकारताना त्याचे उच्चारण आणि लेखन कसे करायचे याचे हिंदीने आपले स्वातंत्र्य टिकविले आहे. हे सर्व स्वाभाविकच आहे. तेव्हा मराठी भाषा व लेखन यांत मराठीपणाची भूमिका स्वीकारली, तर त्यात काही गैर नाही. याच संदर्भात 'तत्सम शब्द' ही संकल्पनाही तपासून घेतली पाहिजे. संस्कृतमधून वर्तमानभाषांनी काही घेतले की, त्यालाच 'तत्सम' म्हणण्याचा रिवाज आहे. एवढेच नव्हे, तर संस्कृतचे 'पावित्र्य', 'शुद्ध स्वरूप' तसेच टिकविले पाहिजे, असा आग्रह सुरू होतो. वस्तुतः एका भाषेतील शब्द दुसऱ्या भाषेत गेला की, त्या शब्दरूपाचे काय करायचे हे ती नवी भाषा ठरवीत असते. कन्नडमध्ये 'ताई' म्हणजे माता, जननी. मराठीने मात्र तो बहीण या अर्थाने स्वीकारला आहे. कन्नडमध्ये 'आई' म्हणजे 'आजी', मराठीत मात्र तो शब्द माता या अर्थाने येतो. कन्नडमध्ये 'अव्वा' हे शब्दरूप स्त्रियांबद्दल आदरार्थाने येते. त्यावरुन मराठीत आलेले 'आवा' हे रूप हीनार्थाने येते. हे असे घडत राहणे हे त्या भाषाप्रकृतीला साजेसेच असते. त्यामुळे संस्कृतमधून घेतला की, तो 'तत्सम' हा भेदच करणे चुकीचे आहे. ती ती वर्तमानभाषा बोलणाऱ्याला हा शब्द आपल्या भाषेत कसा उच्चारायचा आणि लिहायचा, याच्याशीच कर्तव्य असते. हा शब्द कोठून आला या ज्ञानाची अपेक्षा अप्रस्तुतच ठरते. बरे, रूपदृष्ट्या तत्सम पण अर्थदृष्ट्या तद्भव हाही प्रकार भाषेत असतो. 'त्रास' हा भीतिवाचक संस्कृत शब्द मराठीने पीडा, कटकट या अर्थाने स्वीकारला आहे. तेव्हा तत्सम, तद्भव, देश्य, अपभ्रष्टरूप या संकल्पना वेगळ्या अभ्यासक्षेत्रामध्ये विचारात घेतल्या पाहिजेत. त्यांचे अकारण ओझे नित्याच्या भाषा-व्यवहारात होत असल्यास ते झुगारूनच दिले पाहिजे. कारण संस्कृतबद्दल ऋणी असणे वेगळे आणि लाचार असणे वेगळे.

## परंपरेचे काय ?

संस्कृत भाषा किंवा लेखनात तत्सम शब्दांबद्दलची ही मते अनेकांना पटतात; पण मग त्यांना आजवरच्या लेखनपरंपरेचे काय करायचे, ही काळजी लागून राहते. जुने वाङ्मय जुन्या लेखननियमांप्रमाणे लिहिले गेले आहे, ते रद्द करायचे की, पुन्हा नव्यासारखे लिहून काढायचे, असा त्यांचा प्रश्न असतो. याला उत्तर असे की, यापैकी काहीच करायचे नाही आज आपण एकोणिसाव्या शतकातली छापील पुस्तके वाचायला लागलो तर केवळ लेखन नियमच नव्हे, तर त्या काळातले पुष्कळ शब्द, त्यांची विविध रूपे, प्रत्यय यांमध्ये पुष्कळ फरक पडला आहे, हे सहज जाणवते. एका वेगळ्या काळातल्या भाषिक व्यवहाराचे आकलन आपण करून घेत आहोत, याचे भान आपणांस असते. जुन्या हस्तलिखित पोथ्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वाचताना पदोपदी अडायला होते, तेव्हा अशा वेळी जिज्ञासूची भूमिका ठेवूनच वागावे लागते. प्रत्येक पिढीला आधीच्या काळात काय झाले ते समजून घ्यावे लागते. पण व्यवहार मात्र स्वतःच्या काळात करावा लागतो. अर्थात नजीकच्या भविष्यकाळाचे थोडेफार भान ठेवता येते इतकेच. दुसरे असे की, भाषेत आणि लेखनात फरक पडला असे जाणवले, तरी टिकून राहिलेला भागच फार मोटा असतो. तेव्हा पूर्वलेखनपरंपरेचे काय करायचे, ही भीतीही अनाठायी ठरते.

## परिवर्तनाच्या दिशेने...

मराठीसाठी रोमन लिपी स्वीकारावी असे म्हणणाऱ्यांची कळकळ समजण्यासारखी आहे. पण इंग्रजीच्या रूपाने रोमनचा जो अनुभव आपल्याला आला आहे, तो पाहता रोमन लिपी स्वीकारण्याने नव्या अडचणी उपस्थित करायच्या आणि त्या दूर करण्यासाठी पुन्हा उपाय शोधायचे हा अव्यापारेषु व्यापार होईल. पुढेमागे मराठी माणसांचा दृष्टिकोण बदलला, तर कदाचित रोमनचा स्वीकार होऊ शकेलही. पण आज तरी तशी अनुकूल स्थिती दिसत नाही. खरे म्हणजे मराठीच्या मूलभूत गरजा भागविण्यास जी पुष्कळच समर्थ आहे, त्या देवनागरीला अधिक निर्दोष आणि उपयुक्त करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. मराठीसाठी काही नवी लेखनचिन्हे सुरू करण्याची गरज आहे. फक्त लेखनचिन्ह आहे, पण तसा अपेक्षित उच्चार नाही अशी अक्षरे कमी केली पाहिजेत. एका लेखनचिन्हाकडे शक्यतो एकच काम सोपविले पाहिजे. आज एका बिंदूला अनुस्वार (शीर्षबिंदू), अनेकवचन, दीर्घ 'अ' (तुझं बोलणं कळलं), संक्षेप (श्री. सौ.) आणि नुक्ता अशी अनेक कामे करायला लागतात. त्यामुळे अनेक घोटाळे होतात. ते दूर करण्यासाठी उपाय शोधले पाहिजेत. शब्दात स्वाभाविकपणे येणारा विराम आणि आघात दाखविण्याची काही व्यवस्था केल्यास लिहिणे-वाचणे यांतील अंतर कमी होऊ शकेल. यासाठी भाषाव्यवहार करणारी सर्वसामान्य माणसे, भाषेचे शिक्षक, भाषापंडित, लिपितज्ज्ञ अशा सर्वांना एकत्र येऊन काम करावे लागेल. मोठमोठी कामे सहकारवृत्तीने पार पाडणाऱ्या मराठी माणसाला हे अशक्य नाही. मात्र त्यासाठी दुराग्रह आणि अभिनिवेश सोडावा लागेल. लोकव्यवहाराचे एक आवश्यक अंग म्हणून विधायक बुद्धीने या प्रश्नाकडे पाहिले, तर आपले पाऊल इष्ट परिवर्तनाच्या दिशेने पडल्याशिवाय राहणार नाही. १९०४ साली लेखनसुधारणा अथवा शुद्धलेखनाचा सरकारी बंडावा या गाजलेल्या दीर्घनिबंधात सुप्रसिद्ध व्याकरणकार मोरो केशव दामले यांनी म्हटले होते : "ज्या काळी जे प्रचलित ते शुद्धच असते" या विचारातील मर्म आजही जाणण्याची गरज आहे. शुद्धलेखनाचे नियम असे न म्हणता 'लेखनाचे नियम' एवढेच यापुढे म्हणणे हिताचे ठरेल.

मराठी विभाग, फर्गसन महाविद्यालय, पुणे ४११००४



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# इंग्रजी जाहिरातींना मराठीचा झगा

**करुणा गोखले**

मालाचे यथायोग्य वर्णन, गिऱ्हाइकाला आकर्षण वाटेल व माल घेण्यास उद्युक्त करीत अशा रीतीने करणे, हे जाहिरातींचे प्रमुख कर्तव्य आहे, हे कुणीही कबूल करील. त्यासाठी कायद्याच्या चौकटीत राहून नाना क्लृप्त्या वापरणे व हरप्रकारची माध्यमे हाताळणे हा मालविक्रेत्याचा व जाहिरातदारांचा 'मूलभूत हक्क' आहे, हेही कोणी नाकारून चालणार नाही. वापरले जाणारे माध्यम योग्य व बिनचूक रीतीने वापरले गेले पाहिजे, असे काही बंधन आपण जाहिरातदारांवर घालू शकतो का? कायदा याविषयी काय सांगतो, हे या लेखाच्या कक्षेत येत नाही.

जाहिरातींसाठी वापरली जाणारी विविध माध्यमे जर आपण पाहिली, तर असे लक्षात येते, की सामान्यपणे संगीत, रंग, चित्रे, रेखाटने, इत्यादी माध्यमे ढोबळमानाने अचूकपणे वापरली जातात. म्हणजे गीतबद्ध जाहिरातीत बेसूर स्वर सहसा आढळत नाहीत किंवा चित्रमय जाहिरातीत अनावश्यक रंगांचे धब्बे वा रेघोट्या सापडत नाहीत. पण विविध वृत्तपत्रे, मासिके यांमधून प्रसिद्ध होणाऱ्या जाहिराती जर काळजीपूर्वक वाचल्या, तर असे लक्षात येते, की भाषा हे माध्यम मात्र अत्यंत निष्काळजीपणे वापरले जाते. फक्त हेच माध्यम बेजबाबदारपणे व सदोष पद्धतीने का हाताळले जावे? आणि भाषेचा सदोष वापर म्हणजे नक्की काय?

आंतरराष्ट्रीय कंपन्यांच्या व त्याचप्रमाणे ज्यांची उत्पादने भारतभर खपली जातात अशा भारतीय कंपन्यांच्या मराठी जाहिराती जर बघितल्या तर प्रकर्षाने जाणवते की या जाहिरातींनी मराठीचा केवळ बुरखा पांघरलेला असतो आणि या बुरख्यामधून आतील इंग्रजीचा मूळ पिंड दिसल्याशिवाय राहत नाही. थोडक्यात काय, तर या जाहिरातीतील शब्द फक्त मराठी असतात, पण वाक्यरचना, शब्दक्रम, इत्यादी कशातच मराठीपण नसते. अनेक वेळा तर त्यामधून काही अर्थबोधही होत नाही.

उदाहरणादाखल अनेक वर्षे 'कालनिर्णय'मध्ये छापली जात असलेली 'रॅली' पंख्याची जाहिरात घ्या. जाहिरातीत ठळक अक्षरात झळकते खालील काव्यपंक्ती (!) रॅलीफॅन– सुपरस्टार कामगिरी व रचनाकौशल्य असे प्रसन्न ठेवी वर्षानुवर्षे. आता जाहिरात जर मराठीत असेल, तर त्यात 'सुपरस्टार' या इंग्रजी शब्दाचा बायकांत पुरुष लांबोडा कशाला हवा? तसेच 'रचनाकौशल्य' म्हणजे नक्की काय? आणि ते 'प्रसन्न' ठेवायचे, म्हणजे काय करायचे? शिवाय आवाज न करता व वारंवार न बिघडता खोलीतील हवा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

खेळती ठेवणे हे पंख्याचे कर्तव्य आहे. पंखा रचनाकौशल्य प्रसन्न (?) ठेवतो, की नाही, याच्याशी गिन्हाइकाला काही घेणे नाही, हा मुद्दा वेगळाच! वरील जाहिरातीचा अर्थ लावणे (किंवा त्यात अर्थ कोंबणे) हे नाट्यगीतांचे शब्द ओळखून देण्याइतकेच अवघड कर्म आहे, हे कुठलाही मराठी माणूस कबूल करील.

रॅलीफॅनच्या जाहिरातीतील अर्थहीनतेचा उगम नक्की करणे जरा अवघड आहे. पण इतर अनेक जाहिरातींतील अर्थशून्यता ही त्यांच्या मूळ इंग्रजी शब्दरचनांचे सदोष भाषांतर करण्यामुळे आली आहे, हे सहज ताडता येते. उदा., नेसली कंपनीच्या व्हेजिटेबल सिरिलॅकच्या जाहिरातीतील हे वाक्य- **आता नवीन सिरिलॅक- गाजरे व टोमॅटो यांच्या जास्तीच्या उत्कृष्टतेसह.** मराठीत उत्कृष्टता असा शब्द आहे का? आणि असलाच, तर तर त्याचा नक्की अर्थ काय! पौष्टिकता, स्वादिष्टपणा, चविष्टपणा की आणखीन काही? (मोल्स्वर्थच्या सुप्रसिद्ध शब्दकोशात 'उत्कृष्टता' हा शब्द नाही.) 'जास्तीची उत्कृष्टता' हे बहुधा 'extra goodness' या इंग्रजी शब्दप्रयोगाचे शब्दशः भाषांतर असावे.

त्याच जाहिरातीचा- **तुमच्या बाळाला द्या सिरिलॅकचा लाभ** हा मथळासुद्धा तसा अमराठीच! मराठीत कशाचा तरी लाभ होणे अशी रचना प्रचलित आहे. पण कुणाला-तरी कशाचा तरी लाभ देणे असे म्हटले जात नाही. 'बाळाला लाभ द्या' हे 'give your baby the benefit of new Cerelac' या मूळ इंग्रजी वाक्याचे उघडउघड मराठीकरण होय. याऐवजी **तुमच्या बाळाला द्या सिरिलॅकमधील पौष्टिकता** हे आतून-बाहेरून अस्सल मराठी वाक्य वापरता आले असते.

असाच इंग्रजी भाषेचा प्रभाव जाणवतो 'हीरो हंस' या दुचाकीच्या जाहिरातीत. वाचकांचे लक्ष आकर्षून घेते, ते जाहिरातीचे ठळक अक्षरातील हे शीर्षक. **विश्वकीर्तीचे नंबर १ उत्पादक प्रस्तुत करत आहेत सायकल चालवायचा विश्वव्यापी आनंद देणारी नवी हीरो हंस.** खरे तर नंबर या शब्दासाठी 'क्रमांक' हा सोपा-सुलभ शब्द मराठीत असताना इंग्रजी शब्दांचा वापर अनावश्यक आहे. त्याच बरोबर केवळ 'नंबर'च्या ऐवजी 'क्रमांक' हा शब्द घालून क्रमांक '१ चे उत्पादक' म्हणणेही योग्य होणार नाही. कारण मराठीला 'प्रथम क्रमांकाचे उत्पादक अशीच, रचना ग्राह्य आहे. म्हणजेच जाहिरात जर मराठीत असेल, तर त्यातील शब्दच नव्हे, तर शब्दांचा क्रमही मराठीच्या नियमांनुसारच हवा.

पण मराठीच्या शब्दक्रमाच्या नियमांचे उल्लंघन करण्याची आगळीक जाहिराती वारंवार करत असतात. उदाहरणच द्यायचे झाले, तर टोरनेडो व्हॅक्यूम क्लीनरची ही जाहिरात : **एक साधे सोपे उपकरण जे तुम्हांला घराच्या राणीचे स्थान देते.** किंवा नेटलॉन जाळीच्या पडद्यांची जाहिरात : **नेटलॉन हे एकमेव साधन जे तुमचं सुंदर घर किडीकीटकांपासून सुरक्षित ठेवते.**

या दोन्ही जाहिरातींमध्ये नक्की काय चूक आहे, हे कदाचित अनेक वाचकांना पहिल्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

दृष्टिक्षेपात लक्षात येणार नाही. पण जर एखादी समांतर मराठी रचना उदाहरणादाखल दिली, तर वरील जाहिरातींचे अमराठीपण लगेच जाणवेल. मराठीत आपण नेहमी झाडावर चढणारा मुलगा, कष्ट वाचवणारे शिवणयंत्र असे म्हणतो. मुलगा जो झाडावर चढत आहे, किंवा शिवणयंत्र जे कष्ट वाचवते हे मराठी नव्हे. हे केवळ इंग्रजीला मराठी झगा चढवणे झाले. इंग्रजीमधील The boy who is climbing the tree आणि A sewing machine that saves your hard work या रचनांना केवळ पर्यायी मराठी शब्द देणे झाले. त्यांचे मराठीत भाषांतर करणे नव्हे. कारण त्यांमधील शब्दांचा क्रम मराठी नसून इंग्रजीच आहे. मराठीत आधी विशेषणात्मक पोटवाक्य (झाडावर चढणारा, कष्ट वाचविणारे) आणि मग नाम (मुलगा, शिवणयंत्र) असा क्रम ग्राह्य आहे. याउलट, इंग्रजीमध्ये आधी नाम (the boy, a sewing machine) येते आणि मग त्याविषयी विशेष माहिती सांगणारे पोटवाक्य Who is climbing the tree, that saves your hard work, इत्यादी. त्यामुळेच वर उल्लेखिलेल्या दोन्ही जाहिराती चांगल्या मराठीत नटवायच्या असतील, तर त्यांचा सध्याचा शब्दक्रम पूर्णपणे उलटा करावा लागेल व टोर्नेडो– तुम्हांला घराच्या राणीचे स्थान देणारे साधे-सोपे उपकरण आणि नेटलॉन– तुमच्या सुंदर घराला किडीकीटकांपासून सुरक्षित ठेवणारे एकमेव साधन असे म्हणावे लागेल.

इंग्रजीच्या प्रभावाने दूषित झालेल्या मराठी जाहिरातींचे आणखी अनेक दाखले देता येतील. उदा. कोकोराज या खोबरेल तेलाचा प्रचार करताना जाहिरातदार म्हणतो: नावाजलेलं खोबरेल तेलही माझं केस गळणं काही थांबवू शकलं नाही. हे वाक्य मराठीच्या पिंडाला धरून नाही. अस्सल मराठी माणूस म्हणेल: कुठल्याही नावाजलेल्या तेलानं माझं केस गळणं थांबलं नाही. म्हणजेच मराठी वाक्यात 'नावाजलेलं तेल' हा कर्ता नसेल. पण जाहिरातीत मात्र तेल हा कर्ता आहे. याला कारण त्यात मूळ इंग्रजी वाक्यावर फक्त मराठीची झूल चढवली आहे. मूळ इंग्रजी वाक्य बहुधा No leading brand of hair oil could stop my hair from falling असे असणार व त्यात तेल हा कर्ता आहे. त्यामुळे मराठी जाहिरातीतही तेल हा कर्ता ठेवला गेला. त्याचप्रमाणे 'शकणे' (can) या क्रियापदाचा सर्रास वापर हाही इंग्रजीचा स्वभावधर्म– मराठीचा नव्हे!

या सर्व सदोष जाहिराती कशाचे द्योतक समजायच्या? जाहिरातदारांच्या बेजबाबदारपणाचे, त्यांच्या अशिक्षितपणाचे, की वाचकांच्या औदासीन्याचे? जाहिरातदार बेजबाबदार आणि अशिक्षित म्हणावेत, तर ते इंग्रजी जाहिरातींमध्ये इंग्रजीच्या एवढ्या चुका का करत नाहीत? फक्त इंग्रजी जाहिराती मराठीत (किंवा इतर भारतीय भाषांमध्ये) भाषांतरित होतानाच भाषेला एवढ्या अनादराने का वागवले जावे?

आपल्या इंग्रजीमध्ये चूक नको; पण भारतीय भाषेत खोड असली, तरी चालेल! असा जाहिरातदारांचा ग्रह आहे, की काय? बहुतेक असणार! कारण इंग्रजी ही कुठल्याही



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

भारतीयाची मातृभाषा नसतानासुद्धा तिची पूर्ण मिजास राखली जाते. याउलट, मराठी ही लाखोंची मातृभाषा असूनही तिला मात्र सापत्न वागणूक मिळते. तिच्या स्वभाववैशिष्ट्यांचे भान राखले जात नाही आणि तिचे नियमही बेदरकारपणे झुगारले जातात.

नोटा व नाणी हे ज्याप्रमाणे आर्थिक व्यवहाराचे चलन आहे, त्याचप्रमाणे भाषा हे माणसाच्या दैनंदिन व्यवहाराचे व वैचारिक देवाणघेवाणीचे चलन आहे. देशाच्या अर्थव्यवस्थेला बाधा आणणाऱ्या बनावट नोटा ज्या तत्परतेने व कर्तव्यदक्षतेने व्यवहारातून बाद केल्या जातात, त्याच निष्ठेने बनावट भाषेला विरोध केला गेला पाहिजे. तरच भाषेची प्रकृती कायम राहील. सध्याच्या मराठीच्या हेळसांडीचे मूळ कारण हे द्विभाषिकत्व नसून इंग्रजीला दिली जाणारी अवाजवी प्रतिष्ठा व त्यापोटी मातृभाषेचे अवमूल्यन हे आहे. मराठीची ही आबाळ शासकीय पातळीवर, महाराष्ट्रातील औपचारिक व अनौपचारिक भाषाव्यवहारातून सतत स्पष्ट होत असते व त्याचे प्रतिबिंब जाहिरातींमध्ये पडल्याशिवाय राहत नाही. मराठीची घसरगुंडी थांबवण्याची जबाबदारी जाहिरातदार, सर्व प्रचारमाध्यमे व वाचकवर्ग या सर्वांवरच आहे. ग्राहक चळवळींप्रमाणेच वाचक चळवळ उभी करून शुद्ध भाषेचा आग्रह धरला, तर आपल्या भाषेची उपेक्षा थांबवणे सहज शक्य आहे, एवढे मात्र निश्चित.

(सकाळ (पुणे) १९९०-०७-०१ वरून पुनर्मुद्रित)

**सीतेचा विलक्षण नाद**

वाटवेसर शब्दांच्या बाबतीत फार दक्ष होते. आम्ही चुकीच्या अर्थाने एखादा शब्द वापरला, की लगेच तो आमच्या नजरेस ते आणत. ‘ असे भलत्याच अर्थानं शब्द वापरू नका. त्यानं घोटाळे होतात ’ असे ते बजावून बजावून सांगत. एकदा मी जरा अगोचरपणानेच त्यांना म्हणाले, ‘ काय, हो, घोटाळे होतात, सर ! एखादं उदाहरण तरी सांगा. ’ त्यांनी माझ्याकडं पाहिलं. माझ्या शंकेतला किंचित अगोचरपणा त्यांना जाणवला की काय न जाणे. ते मिस्किलपणे म्हणाले, ‘ सांगतो हं ! नीट ऐक. असं पाहा की ‘ नाद असणे ’ याचा अर्थ ‘ एखादी गोष्ट खूप प्रिय असणे ’ असा आहे नं ! ’ मी मानेनंच होकार दिला. मग ते पुढं म्हणाले की, ‘ एखाद्यानं असं विधान केलं, की ‘ सीतेला, किनई, पातिव्रत्याचा फार नाद होता, ’ तर काय होईल ! ’

डॉ. दत्तात्रय पुंडे

[ श्रीमती शांता शेळके यांनी गप्पा मारताना सांगितलेल्या आठवणीवरून ]



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# मराठीचा निष्क्रिय कर्मयोगी

## मॅक्सीन बर्नसन

" लोणंद केव्हा येणार ? "

" नीरा आत्ताच गेली. लोणंद दहा मिनिटांत येईल. "

मी गेली चोवीस वर्षे एस. टी. ने प्रवास करीत असल्यामुळे असले संवाद अनेकदा ऐकते. मात्र त्यातील वाक्प्रचार मला अजूनही मजेशीर वाटतो. जणू काय आपण प्रवास करीत नाहीच. घर बसल्या (म्हणजे बस-बसल्या) आपल्या डोळ्यांसमोर टी. व्ही.सारखी गावांची ये-जा होत असते. मराठी भाषेत अशी उदाहरणे अपवादात्मक नसून प्रातिनिधिक आहेत, असे म्हटले तर वावगे होणार नाही. माणसे निष्क्रिय असून वस्तूंना एक प्रकारचा आक्रमक जिवंतपणा असतो. आपण रस्त्यावर चालत असताना काटा मोडतो, ठेच लागते हे मला समजू शकते, पण बागही लागते !

अशा वाक्प्रचारांच्या मागे एक विशिष्ट तत्त्वसरणी आहे की काय अशी शंका येते. " मला दिसते, ऐकू येते, कळते, समजते, पटते, जमते, आठवते, आवडते, खटकते, भीती वाटते, आनंद वाटतो, हसू येते "- यांसारख्या वाक्प्रचारांमध्ये व्यक्तीला निरनिराळे मानसिक अनुभव येतात. शारीरिक अनुभवाच्या बाबतीतही असेच वाक्प्रचार असतात : " आपल्याला भूक-तहान लागते, मळमळते, ताप येतो, सर्दी होते, चक्कर येते. "

समजणे, आवडणे, पटणे, भूक लागणे यांसारख्या अनुभवांच्या बाबतीत व्यक्ती निष्क्रिय असते हे कदाचित वस्तुस्थितीला धरून असेल. मात्र मराठी भाषेत सामाजिक जीवनामध्येही अशी निष्क्रियता दिसून येते. वधू-वर लग्न करीत नाहीत, त्यांचे लग्न होते. (याच्यात कोणी कर्ती-माणसं असतील, तर ते त्या नवरा-नवरीचे आईबाप.) नंतर त्यांचे प्रेम निर्माण होते, त्यांना मुले होतात, नोकरी मिळते (किंवा मिळत नाही), संकटे येतात, महागाईमुळे परवडत नाही, यश किंवा अपयश येते, नावलौकिक मिळतो, आजारपण आणि म्हातारपण येते, आणि शेवटी मृत्यूही येतो. जीवनामध्ये माणसांनी भरपूर काबाडकष्ट करूनसुद्धा मराठी भाषेच्या दृष्टिकोणातून व्यक्ती ही निष्क्रिय कर्मयोगी.

कर्तरिप्रयोग मराठी भाषेत अजिबात नसतो, असे नाही. माणसे काम करतात, आंघोळ करतात, जेवण करतात, प्रेम करतात. पण भूतकाळामध्ये काय होते, हे पाहा : " त्यांनी काम केले, त्यांनी आंघोळ केली, त्यांनी जेवण केले, त्यांनी प्रेम केले. " कर्ता कुठे गेला ? क्रिया एकदा संपली की, क्रियापदाचा मोहरा कर्त्याला सोडून कर्माकडे वळतो.

इंग्रजी भाषा अगदी याच्या उलट. इंग्रजीत माणसे क्रिया करायला धडपडत असतात.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

ते see, hear, feel, think, like. सर्दी येण्याची वाट देखील न पाहता ते ती झेलण्याचा प्रयत्न करतात ( " catch a cold " ) इंग्रजी वाक्यामध्ये कर्ता असण्याची इतकी गरज असते की, कर्ता नसला, तर एक नकली कर्ता बनवावा लागतो :

" It is raining ", " It Is snowing. "

अशा उदाहरणांच्या आधारे आपण पूर्व-पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाबद्दल निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न केला, तर आपण हमखास फसणार. पुरावे पुरेसे मिळत नाहीत. तरी पण कधी कधी असे वाटते की, या मराठी वाक्यप्रयोगांद्वारे आपण एका प्राचीन विचारविश्वात डोकावू शकतो, जिथे सोबत ना कर्ता, ना कर्म, क्रिया अधांतरीच राहतात. त्या विचार-विश्वाचा सगळ्यांत सुंदर अवशेष सध्या ऐकायला मिळत नाही. पण अजून वाचनात येतो : " इकडून म्हणायचे झाले. "

टपाल पेटी ४०, लक्ष्मीनगर, फलटण ४१५५२३

( अगदी सहज आठवलेली गोष्ट सांगायची, तर इंग्रजी भाषेत अगदी पंधराव्या शतका-पर्यंत me thinketh, me seems, him hungers, it liketh me not असे शब्दप्रयोग रेंगाळत होते. I think, I like सारखे शब्दप्रयोग बाराव्या-तेराव्या शतकात इंग्रजी भाषेत आले- की इंग्रजी भाषा त्या प्रयोगांकडे गेली ? -संपादक )



अनुक्रमणिका
मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# आजीची भाषा

लीला अर्जुनवाडकर

सत्याहत्तर–अठ्याहत्तर वर्षे जगून माझी आजी वारली. त्याला नुकतीच चाळीस वर्षे झाली. म्हणजे अठराशे सत्तर पंचाहत्तर सालच्या सुमाराचा तिचा जन्म. ती फारशी लिहू शकत नसे, पण तिला वाचता मात्र चांगले येत असे. तिच्याच शब्दांत सांगायचे, तर ती 'दोन बुकंदेखील' शिकली नव्हती. कदाचित याच कारणाने असेल, कदाचित ती ज्या काळात वाढली, वावरली, त्याचा वारसा म्हणून असेल, तिची भाषा विलक्षण बोलकी, चित्रमय आणि प्रतिमाघटित होती. चपखल म्हणी, नेमके अर्थवाही शब्द यांनी ती फार समृद्ध होती. परवा तिची आठवण झाली तेव्हा सहजी मनात आले– इंग्रजी, हिंदी, वर्तमानपत्रे, आकाशवाणी, दूरदर्शन इत्यादींच्या बुलडोझरखाली भरडून सपाट झालेली भाषा बोलणाऱ्या आजच्या पिढीला तिची अस्सल, जिवंत मराठी समजेल तरी, की नाही, कोण जाणे! आजीच्या तोंडी सहजी येणारे कित्येक शब्द व म्हणी या चाळीस वर्षांत फारच क्वचित माझ्या कानांवर पडल्या आहेत.

आज नवीनही पातळाचा फारसा बोंगा होत नाही. मग 'अंगापेक्षा बोंगा अन् कुठं जाशील सोंगा' ही म्हण कुठे ऐकायला मिळणार? आजीच्या विश्वासाप्रमाणे बुधवार हा नवीन पातळाची घडी मोडण्याचा खास चांगला दिवस असे. त्याला आधार– 'सोम जाळी. मंगळ फाडी. बुध भेसा. नवं नेसा' ही म्हण. (यातले 'भेसा' हे काय प्रकरण आहे हे मला अजूनही उलगडलेले नाही. त्या शब्दाचा 'वेष'शी तर संबंध नसेल?* ) सोवळे, चूल या गोष्टी आजच्या आयुष्यातून जवळ जवळ हद्दपारच झाल्या आहेत. मग त्यांना किंवा त्यांच्यापासून जपण्यासाठी पातळाचा 'फलकारा' किंवा 'फलगोल' आवरायला कोण सांगणार? आज अतिशय तलम किंवा विरविरीत पातळे खूप असतात. पण त्यांना कोणी 'कोळ्याचं जाळं' म्हणत नाही. एखाद्या गोष्टीचा फार पसारा किंवा प्रपंच मांडल्यावर 'केवढा हो परगणा घातलाय्' असे कोणी म्हटल्याचे कानांवर येत नाही. अनेक लोळ गळ्यात घेणाऱ्या माणसाविषयी आजी म्हणे 'त्याला लोळंकारच फार' आज भुकेने आपला जीव कळवळतो. पण 'भुकेनं अगदी कल्पांत झाला' असे आपण म्हणत नाही. मुले किंवा मोठी माणसे आज रागाने आदळआपट किंवा अकांडतांडव करतात,

* [हिंदी भाषेत भेस याचा अर्थ 'दिखावटी रूप-रंग, बनावटी वेष आदि' असा दिलेला आहे.—संपादक.]



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

थैमान घालतात; पण ' तारांगण ' घालीत नाहीत. रागाने डोळे लालबुंद, अस्वस्थ झाले आहेत. अशा माणसाच्या चेहऱ्याला उद्देशून ती ' तग्र वग्र ' असा शब्द वापरी. तर रागीट माणसाच्या नाकावर, तिच्या शब्दांत, ' राघोपंत गुणे ' कायम मुक्कामाला असत. खमंग खरपूस थालीपिठाला तिचा शब्द होता ' रामरक्षा '.

निर्लज्जपणे किंवा धिटाईने तोऱ्यात हिंडणारणीला आजी ' लंका ' म्हणत असे. ( तिच्या माघारी हा शब्द मी ऐकलाच नाही. पुढे तो एकदाच भेटला. डॉ. रा. चिं. ढेऱ्यांच्या ' लज्जागौरी 'त. ) आजीचा आणखी एक आवडता शब्द म्हणजे ' मोहिनी अस्त्र '. कोण्या तरुण माणसाची घरी येऊ घातलेल्या किंवा आलेल्या नववधूवरून थट्टा करायची झाली की ती, म्हणायची : ' तुमचं मोहिनी अस्त्र येऊ द्या. मग कळेल, हो. '

थट्टामस्करीत, गप्पागोष्टींत खूप हशा पिकला की, ' इतकं हसायला इथं कोण नागवं नाचतंय का ? ' हा तिचा प्रश्न ठरलेला असे. ( अर्थात यावर आम्हीही प्रतिप्रश्न विचारीत असू : ' असं कोणी नाचू लागलंच, तर खरोखरच हसू येईल का ? ' ) चुलीला लावायला आणलेले लाकूड लांब असले की, ती त्याला ' लंबोजी संभानाथ ' म्हणायची. उलट ते लहान असले तर ' आता यानं मी किती वेळ भातुकली खेळू ? ' असे ती विचारी. चुलीशी फार वेळ बसायला लागले तर ती म्हणे : ' आज चुलतसासूबाईंची सेवा आणि पंचाग्निसाधन खूप झालं. '

मुली, सुना, नाती यांचा स्वभाव, त्यांची काम करण्याची पद्धत यांवरून ती कोणाचा ' फुटकं भांडं ', कोणाचा ' उडत पगडं ', कोणाचा ' क्षेत्रीचा न्हावी ' असा उल्लेख करी. कोणाचे काम फार पाडापाडीचे, सांडलवंडीचे असले की, त्या व्यक्तीचा उल्लेख ' घडं घडवा आणि अवसेचा पाडवा ' असा व्हायचाच. आगापीछा नसलेला नवरदेव म्हणजे तिच्या लेखी ' खुंटीवरचा कावळा '. लहान नातवंडांत भांडण सुरू झाले की आजी हमखास त्याला ' युद्धकांड ' म्हणे. एखादी वस्तू अगदी थोडी, कमी असली की, तिच्या मते ती ' नकटीच्या नाकासारखी ' असे. कारण आजीचा मोठेपणाचा निकष म्हणजे ' नाकावीण म्हणू नये सुलक्षणी. ' तरण्याताठ्या लग्न न झालेल्या मुलीचे वर्णन ती ' हरतालका ' म्हणून करी. निश्चित एक न ठरवता जाईल तिकडे जाणाऱ्याला ती म्हणे : ' नरहरदेवाची पालखी झुकली तिकडे झुकली. '

नवरा देखणा आणि बायको सुमार असे जोडपे दिसले की, ती म्हणायची ' नवरा राजावळ आणि बायको गयावळ. ' उलट्या परिस्थितीत हीच म्हण. ' नवरा गयावळ आणि बायको चंद्रावळ ' अशी व्हायची. ' हवं/नको तेच कपाळी आलं. ' या म्हणीचा उपयोग करण्याचे प्रसंग तर वडोवडी यायचे. गप्पागोष्टींत विषय पावळत गेला की, आजी म्हणायची : ' सांगण्यात सांगण्या अन् बैल गेला रांगण्या. ' ( ही म्हण रांगणा किल्ल्याच्या परिसरातली आहे, हे मला किती तरी नंतर कळले. खरे तर आजी गेल्यावर ही म्हण मी फक्त एकदाच ऐकली. पूर्वी वाटायचे बैल रांगायला कसा काय जातो बुवा ! ) ' कुरकुरा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

नवरा, पिरपिरी बायको, तुटकी वहाण, फुटकी सहाण, जावई लहान (म्हणजे आर्थिक किंवा सामाजिक दृष्टया.) नसावा' या एका म्हणीत ती खूपच मोठा जीवनानुभव व्यक्त करीत असे.

इकडे तिकडे निष्कारण वेळ घालवणे म्हणजे तिच्या लेखी 'हालगो मालगो' करणे. हाच मुद्दा 'हालगो मालगो अन् दिवस घालगो' अशा ठसक्यानेही व्यक्त होई. दिवस असा घालवून दिव्यात तेल घालून कोणी काम करायला घेतले की, आजी म्हणे 'दिवस गेला उटारेटी आणि चांदण्यात बसून कापूसवाती.' एखादे नातवंड इतरांना मागे सारून पुन्हा पुन्हा खाऊसाठी पुढे यायला लागले की, ती म्हणे– 'मागून पुढून बाप नवरा. लेकाची वारी कधीच नाही' नवऱ्याची अमदानी म्हणजे तिच्या लेखी 'रामराज्य'. कसेही असले तरी बाईचे हकाचे. उलट मुलाची आमदानी म्हणजे मात्र 'धर्मराज्य' ज्यात त्या बाईला हक्क काहीच नाही. केवळ धर्म म्हणून तिच्यापुढे गोष्टी टाकल्या जातात, असे.

इतरही अनेक म्हणी तिच्या तोंडी कायम असत. उदा.— 'भोपळ्याची भाजी टेकणाला अन् म्हातारा नवरा कुंकवाला.', 'धन्याला धत्तुरा न् चाकराला मलिदा', 'उतावळा नवरा न् गुडघ्याला बाशिंग', 'आईजीच्या जिवावर बाईजी उदार', 'हाजीर तो वजीर', 'जातील ते खडे अन् राहतील ते वेलदोडे.' या अशा म्हणी क्वचित का होईना पण आजही ऐकायला मिळतात. आजीच्या अस्सल ठेवणीतल्या जहाल म्हणी कधी ऐकायलाच मिळत नाहीत. बाकी मिळाल्याच, तर आज लोकांना कदाचित झीटच येईल.

'जो करील पाप, तो जाईल मुंबईला आपोआप','जो पुण्य करी, तो राही पुण्यनगरी' याही दोन म्हणी आजीच्या तोंडी असत.

आपले शाळकरी, पुस्तकी शहाणपण दाखवण्याच्या, म्हणजे दहा-बारा वर्षांच्या वयात मी एकदा तिला म्हटले, 'अग आजी, आता हळहळून काय उपयोग? तेल काय न् अत्तर काय एकदा सांडलं की सारखंच.' तेव्हा ही माझी अशिक्षित आजी मला म्हणाली, 'अहो पंडिताबाई, हे खरं; पण तेल सांडल्यावर नुसताच कळकट डाग राहतो. अत्तराचा मात्र सुवास दरवळतो.'

साक्षरतेच्या आजच्या जमान्यात हे 'अशिक्षितपटुत्व' हद्दपार झाले आहे. निदान पक्षी शहरी आयुष्यातून.

**संस्कृतविभाग, सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे ४११०३०.**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# देशीकार लेणे : ‘ बाशिंग ’

**पंडित आवळीकर / विजया तेलंग**

‘ बाशिंग ’ या शब्दाची व्युत्पत्ती आणि त्याचे लग्नविधीतील स्थान व स्वरूप यासंबंधी पुनर्विचार आवश्यक आहे. रा. चिं. ढेरे सांगतात : “ आज आपल्या लग्नविधीत वराच्या ( आणि वधूच्याही ) मस्तकाला बांधावयाची एक शोभावस्तू ’ एवढेच बाशिंगाचे दर्शनी स्वरूपाचे स्थान राहिलेले दिसत असले, तरी मुळात त्याला एक आनुष्ठानिक महत्त्व होते. बाशिंग म्हणजे दोन शिंगांचा मुकुट. ‘ बाशिंग ’ शब्दाचे घटक दोन : बा आणि शिंग. बा म्हणजे द्वि, दोन. ( उदाहरणार्थ, बावन, बासष्ट, बाहत्तर या संख्यावाचक शब्दातील ‘ बा ’ हे पूर्वपद ‘ दोन ’ या अर्थाचे आहे.) ‘ शिंग ’ हा शब्द संस्कृतातील ‘ शृंग ’वरून आलेला आहे, हे उघड आहे. अर्थात बाशिंग म्हणजे द्विशृंग, दोन शिंगे दोन शिगांनी युक्त असे शिरोभूषण ”[1] बाशिंगाचा प्रतीक म्हणून ढेरे यांनी केलेला मौलिक अभ्यास येथे अप्रस्तुत आहे. कृ. पां. कुलकर्णी यांनी त्याचे ‘ कागदाचे शिरोभूषण ’ असे स्वरूप सांगितले असून या शब्दातील दोन घटकांबाबत ‘ भाल + शृंग (?) ’ असा संदेह प्रकट केलेला आहे. [2]

‘ बा ’ आणि ‘ शिंग ’ हे दोन घटक संस्कृतवरून व्युत्पादिणे आवश्यक नाही आणि त्याचे ( कुलकर्णी–वर्णित ) ‘ कागदी ’ (प्रत्यक्षात ‘ बेगडी ! ) स्वरूप प्राचीन मानावयाचे कारण नाही. ( ‘ बाशिंग ’ हे कशाचे बनवलेले असते / असे या संबंधी ढेरे काही सांगत नाहीत. ) ‘ बाशिंगा ’चे मूळ आणि रूप वेगळे आहे.

सोलापूरमधील मधला मारुती नावाच्या देवळात हनुमानाच्या मूर्तीमागील शिलेवर एक दीर्घ लेख कोरलेला आहे. तो ६८ हून अधिक ओळींचा आहे. खरे तर लेखाची शिळाच नंतर मारुतीची मूर्ती खोदायला वापरलेली आहे. शिव-पार्वती यांचे ‘ विवाह-पुराण ’ म्हटली गेलेली वाङ्मयकृती असे या शिलालेखाचे अनन्यसाधारण स्वरूप आहे. एखादा राजा, रचयिता किंवा शक यांचा निर्देश नसला, तरी हा शिलालेख १२ व्या शतकातला मानला गेला आहे. [3]

या शिलालेखात, हे ‘ विवाह–पुराण ’ असल्याने, साहजिकच लग्नविधीतील ‘ बाशिंग ’ आलेले आहे. पण त्यासाठी ‘ बासिग ’ असा शब्द दोनदा वापरला गेला आहे : (i) हू बासिग ’ विक्क[4] (ii) आ...र... गळेसव बासिग गट्टिदंतिरिर्क्कु[5] पहिल्या उल्लेखा-तील ‘ हू ’ (= पुष्प, फूल) हे पद फार महत्त्वाचे आहे– १२ व्या शतकात ‘ बाशिंग ’ हे फुलांचे करीत आणि ‘ बासिग ’ हा मूळ देशी शब्द आहे. सोलापूरच्या कन्नड शिलालेखात तो प्रथम आढळतो, हेही महत्त्वाचे आहे. ‘ बासिग ’चा अर्थ देताना



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

रिसी–कुंभार स्पष्ट सांगतात : " String of flowers tied to the forehead of bride and bridegroom on the occasion of marriage." [६] किटेलने हा अर्थ " A garland or charlet of flowers worn on the top of the head असा दिलेला आहे. [७] त्याच बरोबर, त्याने 'बसवपुराणा'चा (उत्तरकालीन) संदर्भ देऊन " an ornament of gold " असा अधिकचा अर्थ दिलेला आहे. [७]

किटेलचे हे 'सोने'री स्वरूप त्याच्या 'बेगडी' रूपाशी रंगसंबंध जोडणारे आहे.

'किटेलने 'बासिग' हा शब्द 'वासंग', (!) या संस्कृत (!) शब्दाशी जोडला आहे. 'वासिक' या सुवासिक शब्दाशी तो निगडित करणे अधिक अर्थपूर्ण ठरेल. पण त्याचे एक 'लेणे' म्हणून विशिष्ट रूप ध्यानात घेता तो 'देशी' मानणे अधिक अन्वर्थक ठरेल.

कन्नडमध्ये 'बासिग' असा रूढ असलेला सोलापूर–शिलालेखानंतर, मराठीत दोन महानुभाव कृतींत 'बासींग' बनून आलेला आहे. मुळात या शब्दाच्या कन्नड उच्चारात 'बा'मध्ये निसटत्या अनुनासिकाची विशिष्ट छटा असावी. कन्नडची ही लकब हावनूर, हावेरी, बावी, या शब्दांतील 'हा', 'बा'मध्ये आजही आहे. 'बासिग' या शब्दातील 'बा'मधील निसटते अनुनासिक पुढील 'सि'वर अनुस्वार होऊन चिकटले असावे आणि 'बासिग' हा शब्द नंतर 'बासींग' होऊन मराठीत लिहिला–उच्चारला गेला असावा. हिंदीतील 'वास' या अर्थाच्या 'बाँस' या उच्चारात तेच अनुनासिक वैशिष्ट्य आहे.

श्री गोविंदप्रभु–चरित्रा'त 'वी व्हावो स्वीकारू' (२२४) या लीळेत 'बासींग' (गें) आहे.[९] 'श्रीमुगुटीं बांधलें : मग गोसावीं श्रीमुगुट हालवीति : आणि दोन्ही तोंगलें हालवीतिः" असे वर्णनही आहे. बाशिंग आणणे आणि लग्नप्रसंगी वधूवरांस बांधणे हे काम त्या काळात तेलीण करत होती असे दिसते. 'मेहरी' या तिच्या नावाचा (!) अधिक उलगडा आवश्यक आहे. तसेच 'तोंगले – बाशिंगाला लावलेले मोत्यांचे घोस लोलक'[१०] हा अर्थ कोलते यांनी कोठून दिला, हेही शोधले पाहिजे.

महदंबेच्या 'धवळ्यात' 'मुक्तांमानिकांचे दांडे बासींगा...' (१६); 'बासींगी पद्मराग...' (१९) आणि 'मुक्तांमाणिकांचे दांडे गोमेद पद्मराग बासींगी उधाती' (५४) या चरणातून बाशिंगाला मोत्यामाणकांचे, रत्नांचे 'सर' किंवा 'हार' लावत असत हे स्पष्ट होते. 'तोंगले'मध्ये हाच 'सर', 'हार' हा अर्थ आहे. 'घोस', 'लोलक' हे पर्याय पटणारे नाहीत. 'हालवीति' या गोविंदप्रभूंच्या क्रियेचे 'कर्म' अनेक घास–लोलक हे नसून 'दोन्ही तोंगलें हालवीति'मधून स्पष्ट होणारे दोन 'सर' किंवा 'हार' आहेत.

महदंबेने दोनदा वापरलेला 'दांडे' हा शब्द 'दंडे' असा मुळात असला पाहिजे. 'लीळाचरित्रा'तही हा शब्द येतो. (१२) 'श्रीकंठीं गळदंडा'. 'दंडा : पुष्पहार, हार.' (१३) 'गळदंडा : गळ्यातील पुष्पमाळा.' (१४)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

तेव्हा 'बाशिंग' हा शब्द देशी रंगरूप असलेल्या प्राचीन कन्नडमधील 'बासिग'-पासून आलेला असावा आणि फुलांचे दोन सर किंवा हार असलेला फुलांचा मुकुट असे त्याचे प्राचीन रूप असावे.

**मराठी विभाग, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड, आणि मराठी विभाग, गुलबर्गा विश्वविद्यालय, गुलबर्गा।**

## संदर्भ

१. रा. चिं. ढेरे, लज्जागौरी, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, प्रथमावृत्ती १९७८, पृ. १७१.
२. कृ. पां. कुलकर्णी, मराठी व्युत्पत्तिकोश, के. भि. ढवळे, मुंबई, प्रथमावृत्ती १९४६, पृ. ५४५.
३. Shrinivas Ritti & Anand Kumbhar (Ed); Inscriptions From Solapur District, Shrihari Prakashana, Dharwad. 1988. pp. 167–68.
४. तत्रैव, ओळ ११, P. 66.
५. तत्रैव, ओळ ४३, P. 68.
६. तत्रैव, Introduction, P. vviii.
७. Rev. Kittel. A, Kannada–English Dictionary, P 1109.
८. तत्रैव, P. 1109. 'Mhr. बाशिंग' ही नोंदही येथे आढळते.
९. वि. भि. कोलते (सं), श्री. गोविंद प्रभुचरित्र, अरुण प्रकाशन, मलकापूर, १९५१, पृ. ७५.
१०. तत्रैव, पृ. ११७.
११. सुहासिनी इर्लेकर (सं) महदंबेचे धवळे, आध्यात्मिक साहित्य प्रकाशन, अमरावती–हैदराबाद, श. १८९९, पृ. २६, २७, ३६.
१२. वि. भि. कोलते (सं.), लीळाचरित्र, म. रा. सा. सं. मंडळ, मुंबई, १९८२, पूर्वार्ध, लीळा ११५, पृ. १५.
१३. तत्रैव, पृ. ८७९.
१४. तत्रैव, पृ. ८६७. पू. २७, ११५, १४५; उ. ११, ३६, १३३, ४३१, ४३३.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# कापावे, की चिरावे ?

## बालचन्द्र सखाराम वाळके

टेबलावरचे दोन पिवळेधम्म हापूस सारखे माझ्याकडे पाहत होते. या सीझनमधले ते बहुधा पहिलेच असावेत. त्यांचा गुबगुबीतपणा आणि कातडीवरील रसरशीत कोवळा रंग माझ्या जिभेला सारखा अस्वस्थ करीत होता. त्यांपैकी एकाला कुरवाळत, न राहून मी म्हटलं,

' हे आत्ताच खाऊ यात का ? '

' त्यात काय ? चिरा की. '

' चिरा काय ? '—काप म्हण. '

' आम्ही भाजी चिरतो, तसा आंबाही चिरतो. कापायला तो काय बकरा आहे ? पण तुम्हा भाषा शिकविणाऱ्यांना कुठंही चिरफाड करण्याची सवयच असते. '

माझ्या भाषाज्ञानाच्या चिरफळ्या करण्याची तिची ही नेहमीच सवय. तिला जरा कापू म्हटले, की ती असं चिरूनच टाकते !

प्रश्न प्रतिष्ठेचा होता.

आंबा कापायचा, की चिरायचा ?

तिचे म्हणणे असे, की चिरणे ही एक योजनाबद्ध कृती असते.

चीर पपईची असो, की टरबुजाची, तिला कोरीसारखा एक आकार असतो.

दगडी चिराही आकारबद्ध असावा लागतो.

( हल्ली चिरेबंदी वाडे फारसे दिसत नाहीत, ही गोष्ट वेगळी. )

' त्याला मी उभा ( किंवा आडवा ) चिरीन ', ही सूचक धमकी असो किंवा ' ती असल्या चालीची असेल, तर तिला चिरून टाकीन ', असा क्षणिक निश्चय असो, चिरणे योजनाविहीन असणे कठीण असते.

एक गोष्ट मात्र खरी, की घराच्या भिंतीला ' गेलेली ' चीर किंवा चीर असलेली फळी किंवा हिवाळ्यात पायाच्या तळव्याला ' पडलेल्या ' चिरा यांमागे बहुधा मानवी कर्ता नसल्याने त्यात योजनाबद्धता असण्याची शक्यता कमी. म्हणूनच जमिनीला भेगा पडतात. नाहीतर अगदी चिरकण्यात देखील चिरले गेल्याची शक्यता असते किंवा नीरव रात्री पक्ष्याची फडफड शांततेला चिरीत जाते.

पण माझ्या कापण्यात कुठलीच सुसूत्रता नाही, असं ती कसं म्हणू शकते ?

बकरा कापायचा म्हटला, तरी आपण तो कसाही चिरत सुटत नाही. आणि आपण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

असे कुणाचेही नि कसेही गळे कापू लागलो, तर आपल्याही ' कापल्या करंगळीवर कुणीही मुतायला ' तयार होणार नाही.

कापण्यालाही इतिहास आहे. या पृथ्वीतलावर धारदार पात्याचा जन्म झाल्यापासून काहीही कापायचे माणसाने शिल्लक ठेवले नाही. तत्पूर्वी मात्र माणूस, प्राणी देखील हातानेच ' फाडत ' असला पाहिजे.

पूर्वी हिंदुस्थानात कापण्यासारखे खूप काही होते. मजल दरमजल करीत गझ्नीचा महमूद हजारो किलोमीटरचे अंतर कापून इथे उगाच आला नव्हता. त्याने सोरटी सोमनाथचे सर्व सोनेरी कळस कापून नेलेच, शिवाय हिंदूंचे सारे सैन्य अक्षरशः कापून काढले. महमूदाची ही बेबंद क्रूरता पाहून हिंदू स्त्रिया लटलटा कापत होत्या, म्हणे. (अशा वेळी कुणाच्याही मनाचा थरकाप उडणारच!)

त्यामुळे आंबा कापण्यात मी काही गैर करतोय्, असे मला वाटण्याचे कारण नाही. बटाट्याची भजी करताना आपल्याला बटाट्याचे काप घ्यावे लागतातच, की नाही?

माझे एक डॉक्टर मित्र अनेकदा म्हणतात की, ' कापाकापी करायला आता नको वाटते. ' ते डॉक्टर असूनही मला सांगतात, ' अरे, सोमवारी केस कापू नयेत. '

चिरण्याप्रमाणेच कापण्यातही योजनाबद्धता असते. तरीही आपण कागद कापतो, चिरीत नाही. खिसा कापतो, चिरीत नाही. प्रसंगी केसानेही...

आंबा चिरावा, असे तिचे म्हणणे होते, तरीही मी तो कापला. या गडबडीत माझे बोटही कापले. (कुणी कापले?)

कापलेल्या आंब्याची चीर मी तोंडाजवळ नेली, तेव्हा पिंजऱ्यात पोपट पेरूची फोड खात होता.

तेव्हा ती म्हणाली,

' अरेरे, बोट ' चिरलं ' वाटतं? '

तरीही ' ती 'ला माझ्याकडे उत्तर होते :

' जे जे म्हणून चिरायचे असते, ते आपण कापू शकतो; पण जे कापायचे असते, ते चिरता येतेच, असे नाही. '

अध्यापक–अध्येता, इंग्लिश विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

# मराठी लेखनातील संकेत-चिन्हांचा उपयोग

दा. ल. अडोणी

१

**भाषा आणि जीवन** च्या मागच्या दिवाळी अंकात (७ : ४, १९८९) डॉ. अशोक केळकर यांचा 'मराठी लेखनातील विरामचिन्हांचा उपयोग' या नावाचा विस्तृत लेख प्रसिद्ध झाला. विद्वान व विचक्षण भाषाशास्त्रज्ञ म्हणून मान्य असलेल्या डॉक्टरसाहेबांचे भाषेच्या विविध वैज्ञानिक व व्यावहारिक अंगांवर प्रकाश टाकणारे चिंतन (प्रसंगोपात्त भाषण) आणि लेखन सतत चालू असते.

सध्या मराठी लेखनातील प्रदूषण हे हवेतील प्रदूषणासारखे (म्हणून की काय!) वायुवेगाने वाढत आहे. नामफलके, नियतकालिके व प्रसारमाध्यमे यांच्या जोडीला पुष्कळसे उच्चस्तरावरील विद्यार्थी आणि बहुशिक्षित नागरिक यात नको ती भर घालत आहेत. अशा स्थितीत लेखनातील गौण गणलेल्या विरामचिन्हांविषयी डॉ. साहेबांनी केलेले हे तपशीलवार विवेचन लक्षणीय आहे. एक एक विरामचिन्ह वेठीस धरून ते कामास कोठे जुंपायचे, याचा आदेश न देता प्रसंगानुसार उदाहरणे घेऊन कोठकोठे, कोणकोणती विरामचिन्हे कसकशी उपयुक्त ठरतात, याचा विवेच्य लेखात सूक्ष्म व तारतम्याने विचार केलेला मांडला आहे. अशी ही व्यवहारनिष्ठ व विश्लेषणात्मक मांडणी खचित प्रत्ययोत्पादक आणि विचाराला चालना देणारी ठरते.

डॉ. केळकरांच्या या 'अतिशय अभ्यासपूर्ण व सूक्ष्मविचारी' लेखाच्या अनुषंगाने लिहिलेल्या लेखात * डॉ. चुनेकरांनी विरामचिन्हांच्या विचाराची गंगोत्री म्हणून मेजर टॉमस कँडी यांच्या 'विरामचिन्हांची परिभाषा' या इ. स. १८५० मध्ये प्रकाशित झालेल्या सोळा पृष्ठांच्या पुस्तिकेचा उल्लेख केला आहे. त्याच अंकात या 'सोळा' पानी 'परिभाषेचे, पुनर्मुद्रण (पृ. ३६ ते ४०) केवळ पाच पानांत सामावले असून डॉ. केळकरांच्या लेखाने तब्बल तीस पृष्ठे व्यापली आहेत. यावरून लेखकाच्या सखोल व व्यापक पाहणीची आणि विवरणाची कल्पना करता येते.

२

अत्यंत साक्षेपाने व परिश्रमपूर्वक लिहिलेल्या या विचारप्रवण लेखाची, तो वरवर

* भाषा आणि जीवन, ८ : २ : २७-३०, १९९०



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

चाळून, मळावण करणे फारसे कठीण नाही. तथापि, मराठीतील नव्यव्याकरणांच्या भाषा-शास्त्राच्या या 'पुरोहितां'चे प्रतिपादन बालबोध व माध्यमिक व्याकरणाचे संस्कार झालेल्या मनाला कसे भावते, हे पाहण्याचा आणि आपल्या धारणा 'परिप्रश्न'ने स्पष्ट करून घेण्याचा येथे यत्न करत आहे. विवेच्य लेखाच्या अंतरंगात शिरण्यापूर्वी मुद्रणातील महत्त्वाचे चार दोष सुधारून घेणे अगत्याचे आहे. ते असे :

(य) पृ. ६-स्तंभ २ : 'काकपदचिन्हां'पूर्वी § या इंग्रजीतील सेक्शनमार्क (विभाग चिन्हा-) ऐवजी ∧ हे युक्त चिन्ह ठेवावे.

(र) पृ. ८- ओळ १४ : 'अभाव' ऐवजी 'भाव' हवा.

(ल) पृ. ११-२.१ (क) : 'पूर्णविराम' ऐवजी 'अपूर्णविराम' हवा.

(व) पृ. २०- ओळ १४ : 'त्र' ऐवजी 'त्व' प्रत्यय आहे- असे हवे. किरकोळ अपमुद्रिते सहज लक्षात येतील.

पृ. ६ वर चिन्हांची गटवार यादी दिलेली आहे. तीतील-

(अ) विरामचिन्हांच्या गटात इंग्रजीतील कोलनसाठी ': अपूर्ण विराम (दोन टिंबे) ही संज्ञा योजिली आहे. स्वल्पविराम व अर्धविराम हे एका परीने अ-पूर्ण विरामच असल्यामुळे या नामकरणात अतिव्याप्ती होत नाही काय? ती टाळण्यास व / वा (पारिभाषिक संज्ञा म्हणून कायम ठेवायची तर) पर्यायी म्हणून परंपराप्राप्त 'विसर्गचिन्ह' ही संज्ञा सुचवतो. संस्कृतमध्ये अतः, नमः, पुनः- सारखी अव्यये, सामासिक पदे, धातूंची व प्रातिपदिकांची विकार झालेली रूपे यांत तेवढा विसर्गाचा आढळ होतो. कोठे आवश्यक असूनही अभाव असला, तर तो केवळ 'विसर्ग' या पदाने सांगतात. 'विसर्ग-चिन्ह' असे बहुधा म्हणत नाहीत. तेव्हा (:) विरामबोधक म्हणून 'विसर्गचिन्ह' हा शब्द योजला, तर समजुतीत काही घोटाळा होईल, असे वाटत नाही. या पर्यायाचा विचार व्हावा.

(आ) संस्कृत कोशकार कै. वा. शि. आपटे यांनी 'इंग्लिश संस्कृत डिक्शनरी'त 'colon द्विबिंदुः' असा दिलेला प्रतिशब्द, समोरील : ('दोन टिंबे') चिन्ह व मूळ पद ('अपूर्णविराम') ऐवजी द्विबिंदुचिन्ह म्हणून स्वीकार्य ठरावे.

(इ) संदर्भ चिन्हांच्या गटात '※ तारकाचिन्ह फुली' याचा पर्याय म्हणून ★ या चिन्हाचीही नोंद करायला पाहिजे. हस्तलिखितात याचा वापर होतो, हे लेखकाने पुढे नमूद केलेलेच आहे.

(उ) '० संक्षेपचिन्ह (पोकळ शून्य' या ऐवजी '०/. संक्षेपचिन्ह (पोकळशून्य वा भरीव टिंब)' अशी नोंद हवी होती. लेखकाच्या नावाच्या आद्याक्षरांत-संक्षेप असल्यास बहुधा सर्वत्र हाच पर्याय रूढ झालेला दिसून येतो.

(पाहा : पृ. ६ ओळ २- अशोक रा. केळकर) लेखकाने स्वतः हा पर्याय पृ. २१ वरील शेवटच्या ओळीत वापरला आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

(ऋ) चारही संदर्भचिन्हांचा उपयोग लेखातील बाबींचे आधार– त्यांचे स्थलनिर्देश तळटीपांत नमूद करण्यासाठी होतो. योग्य ठिकाणी या कार्याचा उल्लेख इष्ट ठरेल.

(ऌ) संदर्भचिन्हांसमोरील चिन्हचतुष्टयाला तेवढे गटनाम नाही. त्यांना ‘स्फुट चिन्हे’ म्हणण्यास प्रत्यवाय नसावा.

लेखातील मुख्य मुद्द्यांचे मुद्रण जाड ठशात केले, ते (उप–)युक्ततेला धरून आहे. याच प्रकारे सूत्रांचे अंकनिर्देश जाड ठशात झाले असते, तर ते सोयीचे ठरले असते. उदाहरणांना मग कंस कोष्ठकांत (सध्याच्या बारीक ठशात) अनुक्रम देता आले असते. असे परिगणन लेखकाला अभिप्रेत आहे, हे पृ. १२– सूत्र २.२ च्या शेवटी आलेल्या ‘दुसऱ्या, चौथ्या, पाचव्या उदाहरणांत... आहे.’ या निर्देशावरून स्फुट होते. नेमक्या उल्लेखासाठी हे उपयुक्त ठरते.

## ३

लेखाच्या शिरोभागी ‘विरामचिन्ह’ हे पद आले आहे. तेव्हा तदन्तर्गत विरामचिन्हे व भेदकचिन्हे ही आपाततः व/वा आपोआप कमीअधिक प्रमाण असलेली विराम दाखवणारीच चिन्हे आहेत, असे एका परीने म्हणता येते. तथापि, एकदा लेखाच्या व नंतर गटाच्या शिरोभागी उपयोजिल्यामुळे ‘विराम’ पदाच्या तात्पर्यात–आशयात अर्थभेद संभवतो. आधी आलेले पद सर्वसाधारण, समावेशक अर्थाने आलेले असून नंतर ते कमी...अधिक (स्वल्प...पूर्ण) विराम सूचित करणारे विशेषक म्हणून योजिलेले दिसते. (या लेखाच्या शिरोभागी पहिल्या ‘विरामचिन्हा’ऐवजी ‘संकेतचिन्ह’ अशी योजना केली आहे.)

भेदकचिन्हांचा वेगळा गट आहे. त्यातील अवतरण, संयोगी–वियोगी व विविध कोष्ठकचिन्हे वाचनात मुळीच अंतराय उत्पन्न करत नाहीत काय? मार्गक्रमण करताना वाटेत ‘थांबा/ठहरिये/STOP’ अशा फलकांवरील ‘विराम’चिन्हांप्रमाणे दुसरे कोणते बोधक–भेदक–चिन्ह समोर टाकले, तर ते वाटसराच्या ठायी– ‘विराम’चिन्हाइतके नसले, तरी–मुळीच व्यवधान उत्पन्न करत नाहीत, असे म्हणवत नाही. ते ‘स्वल्पा’ पेक्षाही अल्पसा अंतराय आणत असेल, तर–

पृ. ९–१.१ (ख): (५) ‘तुम्ही कुठं गेला होता?’, त्यानं विचारलं.

–येथे आधी एक ‘विरामचिन्ह’–प्रश्नचिन्ह आले असतानाही कंस कोष्ठकानंतर स्वल्पविराम ठेवला आहे. तो आगंतुक ठरावा. हाच प्रकार पृ. १८–४.२ मधील (२) या उदाहरणातील पहिल्या वाक्यानंतर दिसतो.

पृ. १०–१.२ (ख): (७) “इथं बसा. हे पत्र वाचा”, त्यानं म्हटलं. १.३ (ख) (२) ‘वारेवा!’, तो म्हणाला.

–उदा. क्रम (७): अवतरणचिन्हांत दोन आज्ञार्थक वाक्ये आहेत. ‘बसा’ प्रमाणे ‘वाचा’ नंतरही पूर्णविराम द्यायला हवा: असे वाटते. दुसरे दोन्ही उदाहरणांत पूर्णविराम,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

उद्गारवाचक चिन्हानंतर, अवतरणचिन्ह बंद केल्यावर–दोहोंनी मिळून पुरेसा विराम–अंतराय आल्यानंतर ठेवलेला स्वल्पविराम आवश्यक नाही असे वाटते. मागे पृष्ठ ८ वर (१) मध्ये विरामचिन्हांची माळ तयार होऊ देणे शक्य तो टाळावे, असे सूचित केले आहे, हे वेगळेच.

अवतरणचिन्हाबाहेर विरामचिन्ह ठेवण्याचा प्रकार पुढेही आला आहे. पाहा : पृ. १८ ओळ १ : " मी मुंबईहून परतलो त्याला ", तो म्हणाला, " खूप दिवस झाले. "

–तो जे काय म्हणाला, ते अवतरणातील दोन लहान वाक्यांत मिळून सांगितले आहे. हे कथन मोठ्याने सलग वाचले, तर 'त्याला' या पदानंतर 'अस्पष्टसा तुटकपणा' जाणवतो. तो सुचविणारा स्वल्पविराम लगेच देणे इष्ट-युक्त ठरते. अवतरणानंतर तो नको. दुहेरी अवतरणचिन्हांचे कार्य बोललेल्या शब्दांचे समावेशन एवढेच. त्या बोलण्यात पृच्छा, विस्मय, उत्कटता, कच्चा–पक्का अन्वय, कमी–अधिक गुंतणूक, स्पष्टास्पष्ट तुटकपणा इत्यादी पैकी काय ते सुचविणारे विरामचिन्ह अवतरणचिन्हांच्या मर्यादेतच ठेवणे इष्ट व उचित ठरते. एकदा अवतरणचिन्ह मिटले, की 'उक्ती'संबंधातील शब्द, रूप व अर्थ या त्रिविध अंगव्यवस्थेला धरून होणारे कार्य समाप्त होते, असे वाटते. या दृष्टीने पृ. २५ वरील 'समायोजना'तील उदा.,

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | मधील संधिपूर्व वाक्यात शेवटी आलेला— | . | पूर्णविराम |
| (२) | ,, ,, ,, आलेले— | ? | प्रश्नचिन्ह |
| (३) | ,, ,, ,, आलेले— | ! | उद्गारचिन्ह |
| (४) | ,, ,, " मी मुका आहे. " यातील | . | पूर्णविराम |
| (५) | ,, ,, (आकृती ५ पाहा.) | " | ,, |
| (६) | ,, ,, " मी...परत आलो; ", | ,, | स्वल्पविराम |

[उदा. ५ वगळून इतरांतील विरामचिन्हे अवतरणे मिटल्यावरची.]

शब्दाची व्युत्पत्ती साधताना मधली अवस्था दाखविणारे संभाव्य पण न सापडलेले शब्दरूप कित्येकदा वर तारकाचिन्हासह 'कल्पितरूप' म्हणून नोंदवितात. वरील वाक्ये तशी नसतील, असे कल्पितो. अवतरणानंतर दिलेली वरच्यासारखी विरामचिन्हे अन्यत्र योजलेली माझ्या पाहण्यात नाहीत. मान्य लेखकांनी आपल्या लिखाणात यापूर्वी कोठे अशी योजना केलेली असेल, तर ती पाहण्याची उत्कंठा आहे. एखादा प्रयोग पूर्वी झालेला (पाहण्यात) नाही एवढ्यासाठी तो अप्रशस्त ठरतो, असे मात्र म्हणायचे नाही.

**४**

पृ. १३– सूत्र २.३ खालील उदा. (५)– 'प्रिय महाशयः पत्र मिळाले...'

–'अगदी कच्चा अन्वय सुचविण्यासाठी' येथे पत्रातील संबोधनानंतर 'अपूर्णविराम' (वा द्विबिंदुचिन्ह) ठेवले आहे. अशा ठिकाणी स्वल्पविराम देण्याची पद्धत बहुधा सार्व-







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

त्रिक झाली आहे. इंग्रजीतील व इंग्रजीच्या प्रभावाखालील मराठी व्याकरणातील ' संबो-धनापुढे स्वल्पविराम ' या उत्सर्गाला हे धरून आहे. मायन्यातील संबंधापुढे ' :/, ' असा चालणार नाही काय ?

उदा. ( ७ )– ' कोणे एके काळी, एक राजा होता. '

–याचे कारक प्रेरक सूत्र २.३ वाक्यद्वयाच्या संबंधात मार्गदर्शन करणारे आहे. या ' शुद्ध वाक्याला हे सूत्र लागू करू नये. क्रियाविशेषणात्मक पदबंधानंतरचा स्वल्पविराम गाळणे इष्ट ठरावे.

पृ. १५– सूत्र ३.१.२ च्या अनुषंगाने आलेली दोन वाक्ये—

उदा. ( ८ )– ' तो नक्कीच उद्या मुंबईहून येईल. ( ' नक्कीच ' हे वाक्यविशेषण.)'

उदा. ( ९ )– ' नक्कीच तो उद्या मुंबईहून येईल. '

१ ल्या वाक्यातील ( ) वाक्यविशेषण ही संज्ञा वर्णनात्मक व्याकरणातील दिसते. [ सूत्राखालील टिपेत वाक्यविशेषणाचे स्वरूप सांगितले आहे. ]

–संपूर्ण वाक्याशी अन्वित असणारे विशेषक ते वाक्यविशेषण असे कल्पून पडताळा घेऊ लागलो. प्रस्तुत वाक्यात आधी कर्तृपद, नंतर क्रमाने निश्चितार्थक व कालदर्शक क्रियाविशेषणे, त्यानंतर अपादानार्थक ( पंचमीतील ) पद अशी ही सारी पदे ' येईल ' या क्रियापदाशी संबद्ध दिसतात. तेव्हा हे ( वाक्यान्तर्गत ) ' नक्कीच ' वाक्यविशेषण कसे, हे लक्षात आले नाही. याऐवजी उदा. ९ मधील ' नक्कीच ' ( ~हे नक्कीच आहे, की– अशा आशया–) चा पुढील पूर्ण वाक्याशी अनुबंध दिसतो. तेव्हा उदा. ( ८ ) ऐवजी ( ९ ) मधील ' नक्कीच ' वाक्यविशेषण ठरणार नाही काय ?

पृ. १५– नियम ३ क. ३.१.२ खालील उदाहरण– पुणे ४११०३०→ बहुधा पिन-कोड नंबर स्थान- निर्देशानंतर खाली वेगळ्याने नमूद करण्याची प्रथा सर्वत्र दिसते. कार्डावर व आन्तर्देशीय पत्रावर राखीव जागी तो लिहितात. स्थाननामानंतर ' पुणे–३० ' असा संक्षेप रूढ दिसतो.

पृ. १७ सूत्र ३.२.२– वरून ( ५ ) वे वाक्य– ' काशी, रामेश्वर...जाऊन आला.'

–संबद्ध सूत्र ३.२.२ मध्ये या वाक्यात आलेल्या वियोगीचिन्हाचा उल्लेखच नाही. म्हणून हे उदा. येथे आगंतुक– अप्रस्तुत ठरते. दुसरे, हेच वाक्य मागे पृ. १३ वर (१२) वे उदा. म्हणून योग्य ठिकाणी आले आहे.

पृ. २१– सूत्र ५.३.६ : जर...तर...अंतिम पद खंडाच्या जागी संक्षेपचिन्ह किंवा पूर्णविराम वापरावा. ' –अधोरेखित भागाऐवजी ' संक्षेपचिन्हांतील (०/.) इष्ट तो पर्याय ' असा बदल सुचवतो.

लहान भरीव टिंबाला कार्यप्रसंगानुसार अनुस्वार, पूर्णविराम, संक्षेपचिन्ह व दशांश-चिन्ह असे म्हणतात.

पृ. २२– सूत्र ६.३ : ( पूर्णविरामाचा... पुष्कळदा... म्हणतात. ) गणितात त्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद
अनुक्रमणिका

अपूर्णांकबोधक चिन्हाला ' पुष्कळदा ' नव्हे, तर नेहमीच दशांशचिन्ह म्हणतात.

पृ. २४– सूत्र ९.१– ' ( तारकाचिन्हाऐवजी, उदा. २ किंवा २ क देखील येऊ शकेल...) '–हवाला दिलेल्या सूत्रनिर्देशात अपमुद्रण आहे. तेथे २.२ (क) असे वाचावे. येथील चिन्हासाठी पृ. १७- ४.१ (ग) सूत्राकडेही लक्ष वेधता येते. तेथील ५ व्या उदाहरणाला बंदिस्त करणारे कंस–कोष्ठक मात्र अनावश्यक वाटते. ते अपमुद्रण असावे.

पृ. २७– सूत्र १०.३ ओळ १–' अर्धविरामाच्या जागी केवळ आणि घालता येईल, '... या वाक्यातील ' केवळ आणि ' ही दोन पदे अशी एकेरी अवतरणात ठेवणे प्रशस्त ठरेल.

पृ. ३१– भेदकचिन्ह- उदा. ( २ ) ' एम्. ए. ( पण : पी–एच. डी. '– असे लेखन केले आहे. या जोडपदवीचे लेखन इंग्रजीप्रमाणे ' एम्. ए., पीएच्. डी. ' असे प्रशस्त ठरेल.

सूत्रांचे प्रतिपादन करणाऱ्या शब्दरचनेच्या शेवटी आलेले ( सूत्र ७ सोडून ) पूर्णविराम चिंत्य वाटतात. सूत्रे १, ५ व ८ हे केवळ पदबंध आणि सूत्र ३, ४ व ६ मधील दुसरे अपुरे वाक्य संपल्यावर ' शेवटी. ' असे पूर्णविरामासह छापलेले आहे. हा मुद्रणदोष असावा, असे वाटते. सूत्र २ मध्ये ' असेल तर– ' असे वियोगीचिन्हासह मुद्रित झाले आहे. तसे इतरत्रही नको काय ?

५

विरामचिन्हे आणि तत्संबंधक सलग देणारे परिशिष्ट अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त वाटेल. सूत्रांच्या पोटी–पोटविभागांत विरामचिन्हांची, अन्वय, गुंतवणूक, तुटकपणा इ. गमके सांगितली आहेत. पदांतील मागचा–पुढचा बोधपर व भावनिक संबंध ( जसा अर्थ-निर्णयास तसा ) येथेही विशेष महत्त्वाचा ठरतो. एका ' अन्वया 'चे– अगदी कच्चा, काहीसा कच्चा, कच्चा, बरा, काहीसा कमी पक्का, काहीसा पक्का, पक्का, अगदी पक्का– असे सूक्ष्म भेद केले आहेत. लेखातील सर्व विवेचनावरून डॉ. केळकर यांच्या तलस्पर्शी बुद्धीची आणि तारतम्य वृत्तीची कल्पना येते. त्यांनी हा असा तपशिलवार आलेख सादर केला, तो केवळ ' स्वान्तः सुखाय ' वा विद्वान साहित्यिकांसाठीच नव्हे. हे अनुशासन सुशिक्षितांनीच नव्हे, तर लिहिणाऱ्या सर्व स्वभाषिकांनी उपयोगात आणावे, अशी त्यांची अपेक्षा आहे. यासाठी तर त्यांनी नित्याच्या व्यवहारातील वाक्ये विचारात घेतली आहेत.

तथापि, वर नमूद केलेले ' अन्वया 'तील आठ बारकावे ध्यानी घेऊन योग्य त्याच विरामचिन्हांचा वापर करण्याचे अवधान लिहिण्याच्या ओघात राखणे लेखकाला जड जाणे संभवते. तेव्हा निर्दिष्ट विरामचिन्हाचा अभाव विवक्षित भावबोधास बाधक होत नसेल, तर समकल्पचिन्ह पर्याय म्हणून वापरून निर्वाह करता येईल. असा काही कमी गुंतागुंतीचा व शक्य तेथे बाह्य~शाब्दिक गमके सांगणारा (उदा.–' सामान्यतः व, आणि, पण, परंतु



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

अशा-उभयान्वयी–शब्दांपूर्वी स्वल्पविराम ठेवू नये.) आराखडा बनवणे शक्य झाले, तर तो सर्वोपयोगी व व्यवहारक्षम होईल असे वाटते. या दृष्टीने स्वल्पविराम, ' अपूर्णविराम ' ( ~ द्विबिंदुचिन्ह ), वियोगचिन्ह व कंस कोष्ठक हे प्रसंगानुरोधाने व लेखकाच्या वृत्तीला अनुसरून पर्यायी ठरू शकतात, असे म्हणता येईल.

विरामचिन्हांच्या वापरात लिहिणाऱ्याचे मतस्वातंत्र्य डॉ. साहेबांनी आरंभीच स्वीकारले आहे. तरी त्यात काही– किमान व्यवस्था असणे हे भाषेच्या व व्यवहाराच्या दृष्टीने अगत्याचे आहे. त्यांचा लेख आदर्शरूप ( Normative ) म्हणता येईल. विरामचिन्हांच्या समुचित उपयोगासाठी त्यांनी जो एवढा प्रपंच केला, तो साक्षरांचा लेखन–प्रपंच अधिक ' नेटका ' व्हावा, या हेतूने. आपले लेखन कितपत नीटस–सुविहित हे पाहण्यासाठी त्यांनी हा ' आदर्श 'समोर ठेवला आहे. तोही लेखकाच्या विवक्षेला आणि तदनुसार उचित वाटणाऱ्या ' विरामां 'च्या विकल्पाला वाव ठेवून हे लक्षणीय आहे : किंबहुना डॉ. केळकरांच्या या विकल्पानुकूल वृत्तीच्या आधारानेच आपल्या कल्पना व शंका समोर ठेवण्याचा ' धिवसा ' येथे केला आहे.

**एच् १ / ४४४, लक्ष्मीनगर, महा. गृहनिर्माण परिसर, पुणे ९**

## मराठी लेखनातील संकेत–चिन्हांचा उपयोग : काही नोंदी

**अशोक रा. केळकर**

प्रा. दा. ल. अडोणी यांनी माझा दीर्घ लेख बारकाइने वाचून काही सूचना, काही परिप्रश्न केले आहेत, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. (याच ठिकाणी डॉ. सु. रा. चुनेकर, डॉ. द. न. गोखले, आणि डॉ. विजया देव यांनी **भाषा आणि जीवन** ८:२ उन्हाळा १९९० अंकात माझ्या लेखाच्या संदर्भात लिहिलेल्या टिपणांबद्दलही त्यांचे आभार मानणे अनुचित होणार नाही.) पुढील नोंदींत प्रा. अडोणी यांच्या लेखातले संदर्भ चौकोनी कोष्ठकात आणि माझ्या लेखातले संदर्भ कंस कोष्ठकात दिले आहेत, म्हणजे घोटाळा व्हायला नको.

[ छेदक २ मुद्रणदोषाची नोंद (२) ] (पृ. ८ ओळ १४) येथे ' अभाव 'ऐवजी ' भाव ' हवा, असे प्रा. अडोणी म्हणतात. हा मुद्रणदोष नाही. संदर्भ मूळ असा: विधानवाक्य किंवा आज्ञावाक्य यांच्या शेवटी जो पूर्णविराम येतो, तो शब्दांगव्यवस्था, रूपांगव्यवस्था, आणि अर्थांगव्यवस्था या तीनही पातळ्यांवरील काही गोष्टी चिन्हांकित करतो, हे सांगताना पूर्णविराम अर्थाच्या अंगाने प्रश्न किंवा उद्गार या अर्थांचा अभाव दाखवतो, असे मला म्हणायचे आहे. पूर्णविरामामुळे वाक्य विधान किंवा आज्ञा आहे, हे भावरूपाने



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कळत नाही, तर ते वाक्य प्रश्न किंवा उद्‌गार नाही, एवढेच अभावरूपाने कळते, असे मला सुचवायचे आहे.

[ छेदक २ चिन्हांच्या यादीबद्दलच्या नोंदी ( अ ), ( आ ) ] अशा प्रकारच्या चिन्हांना सोयीनुसार दोन प्रकारे पारिभाषिक संज्ञा योजता येतात, चिन्हांचे बाह्यरूप सुचवणाऱ्या संज्ञा (उदाहरणार्थ, दंड, काकपदचिन्ह) किंवा त्याचे कार्य सुचवणाऱ्या संज्ञा ( उदाहरणार्थ, प्रश्नचिन्ह, विकल्पचिन्ह ). या ठिकाणी ' सुचवणाऱ्या ' हा शब्द महत्त्वाचा, संज्ञेची पारिभाषिक व्याख्या देताना जी काटेकोर समव्याप्ती अपेक्षित असते, ती इथे अपेक्षित नाही. मराठी भाषेतील स्त्रीलिंगीप्रत्यय स्त्रीचा निर्देश सुचवतात, पण ते प्रत्यय लागलेली सर्वच नामे स्त्रीवाचक नसतात हे सगळ्यांना ठाऊक आहे. टॉमस कँडी यांच्या लेखातली नावे मराठीत रूढ झाली. कोलनचा समावेश त्याने केला नव्हता. अजूनही काही मराठी भाषकांना हे चिन्ह नीटसे माहीत नसते, माहीत असले, तर त्याचे कोलन हे इंग्रजी नावच ते वापरतात. असो. अपूर्णविराम हे नाव लुप्त दिवसांपासून पाठ्यपुस्तकांतून आढळते. उदा., रा. भि. जोश्यांची व्याकरणपुस्तके. विसर्गचिन्ह हे नाव विरामचिन्हासाठी वापरलेले माझ्या तरी वाचनात नाही, आणि त्यामुळे समजुतीत काही घोटाळा होणार नाही, हा प्रा. अडोणींचा आशावाद मला तरी पटत नाही. मुख्य म्हणजे एका संज्ञेला दोन पारिभाषिक अर्थ असले, म्हणजे किती पंचाईत होते, हे आपण पाहतो. ( ' स्वर ' शब्दाला तीन अर्थ आहेत. ) द्विबिंदु हे नाव मराठीमध्ये ग्रंथपालनशास्त्रामध्ये ' द्विबिंदु वर्गीकरण ' या ठिकाणी रूढ झाले आहे. तो एक स्वतंत्र पारिभाषिक अर्थ त्या शब्दाला अगोदरपासून आहेच.

[ छेदक २ ( उ ) ] पोकळ शून्य हे जुने चिन्ह आहे; उलट भरीव टिंब हे त्याचे दुसरे रूप नसून पूर्णविरामाचाच इंग्रजीतून आलेला तो आणखी एक उपयोग आहे. संक्षेपचिन्ह आणि पूर्णविराम यांची एकत्र दखल मी सूत्र ( ५.३.६ ) मध्ये घेतली आहे. सूचीवरून सहज समजून येईल.

[ छेदक २ ( ऋ ) ] तळटीपा मुख्य मजकुराला जोडणे या कार्याचा निर्देश योग्य ठिकाणी म्हणजे ' मांडणीचे विशेष ' या छेदकाच्या शेवटच्या परिच्छेदात केला आहेच. ( पृ. २९ पाहावे. ) हे सूचीवरून लक्षात यावे.

[ छेदक २ ( ल ) ] संदर्भ चिन्हे हे शीर्षक आठही चिन्हांना उद्देशून आहे, ते केवळ डाव्या स्तंभातील चार चिन्हांपुरते मर्यादित नाही, हे लक्षात यावे.

[ छेदक ३ ] ( १.१ ख ) सूत्राबद्दल. ' तुम्ही कुठं गेला होता ? ', त्यानं विचारलं. या उदाहरणामधला स्वल्पविराम आगंतुक नसून तो मागचा अवतरणचिन्हांकित प्रश्न आणि पुढचे विधान ही एकाच वाक्याचे भाग आहेत, हे दाखवण्याचे काम करीत आहे. (४.२ ) मधील दुसऱ्या उदाहरणात तर हा मुद्दाच अधिकच स्पष्टपणे दिसतो. तो म्हणाला, याच्या मागेपुढे स्वल्पविराम आवश्यक आहेत. प्रा. अडोणींच्या म्हणण्यानुसार ते दोन्ही आगंतुक ठरावेत, कारण दुसऱ्या स्वल्पविरामानंतर खुलते अवतरण चिन्ह आले आहे. अर्थात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

विरामचिन्हांची गर्दी कमी करावी असे त्यांना सुचवायचे असले, तर ते बरोबर आहे. (सूत्र ९) पाहावे.

[छेदक ३] (१.२ ख) सूत्राबद्दल. दुसऱ्या आज्ञावाक्यानंतरचा पूर्णविराम (९-२ ख) अन्वये गळतो. विरामचिन्हांची माळ शक्यतो टाळावी यातील 'शक्यतो' हे पद महत्त्वाचे.

'मी मुंबईहून परतलो त्याला', तो म्हणाला, 'खूप दिवस झाले.' या उदाहरणामधला पहिला स्वल्पविराम अवतरणचिन्हाच्या आत जाऊ शकत नाही. तो जे वाक्य म्हणाला, ते वाक्य सलग लिहून पाहिले, तर त्याला आणि खूप या दोन शब्दांत कोणतेच विरामचिन्ह येणार नाही.

(९.२) मध्ये दिलेल्या उदाहरणांच्यापुढे कंस-कोष्ठकात 'संधी व्हायच्या आधी :' असे म्हणून जे लेखन-रूप दिलेले आहे, ते प्रत्यक्ष व्यवहारातले नसून (९.२) हे सूत्र नसते, तर विरामचिन्हांची कशी गर्दी झाली असती, याची कल्पना देणारे लेखन-रूप आहे तशी रूपे प्रा. अडोणींना कुठे दिसली नाहीत, हे स्वाभाविकच आहे.

[छेदक ४] (२.३) या सूत्राबद्दल. प्रिय महाशय या मायन्यानंतर (२.३) या सूत्रानुसार मिळणाऱ्या तीन पर्यायांपैकी कोणता निवडायचा, हे लिहिणाऱ्याच्या विवक्षेनुसार ठरेल. प्रिय महाशय नंतर स्वल्पविराम ठेवला, तर ते या सूत्रानुसार चुकीचे ठरणार नाही. मायन्यांमधील संबोधन तसे तुटून पडलेले असते, हे दाखवण्यासाठी आपण पुष्कळदा मांडणीचा आश्रय घेतो आणि ओळ तोडतो, हे मात्र खरे. पत्राची मांडणी हा एक स्वतंत्र विषय असल्यामुळे तो आधीच लांबलेल्या या लेखातून बाजूला ठेवला. प्रिय महाशय नंतर पूर्णविराम आढळत नाही, एवढे मात्र निश्चित. (तुलनेपुरते सांगायचे, तर– जर्मनभाषक पत्राच्या मायन्यानंतर पुष्कळदा उद्गारचिन्ह वापरतात; इंग्लिशभाषक स्वल्पविराम किंवा अपूर्णविराम वापरतात किंवा केवळ ओळ तोडण्यावरच भागवतात.)

एका मुद्द्याचा पुनरुच्चार करायला हवा– मी मांडलेली व्यवस्था लवचीक आहे. अमुक एका प्रसंगी एकच एक विरामव्यवस्था होऊ शकेल, असा आग्रह माझ्या मांडणीमागे नाही. लेखकाच्या विवक्षेला तिच्यात भरपूर कुस आहे.

कोणे एके काळी, एक राजा होता. या उदाहरणात कोणे एके काळी हा साधा, नेहमीसारखा वाक्यघटक नाही, तो आग्रविस्थापित वाक्यघटक आणि म्हणून काहीसा स्वतंत्र वाक्यवजा आहे, हे आधुनिक भाषाविश्लेषण मला अभिप्रेत आहे. अशा विस्थापनांची विस्तृत चर्चा मी अन्यत्र केली आहे– 'मराठी भाषेतील पदक्रम', **भाषा आणि जीवन** ३ : ४ दिवाळी १९८५. असा खुलासा मी न केल्यामुळे (सूत्र २.२, २.३) यांच्या बाबतीत प्रा. अडोणींना जी शंका आली, ती अगदी रास्त आहे. कोणे एके काळी यानंतर कोणतेच विरामचिन्ह न ठेवणे (सूत्र २.३ व) अन्वये अगदी ग्राह्य ठरेल. सूत्र २.३ ग (स्वल्पविराम) आणि सूत्र २.३ घ (कोणतेच विरामचिन्ह नसणे) यांतला



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

कोणता पर्याय स्वीकारायचा, हे वाक्य कोणत्या प्रसंगात वापरलेले आहे याचा विचार करून ठरवावे लागेल, कुशल लेखक असले निर्णय जाणीवपूर्वकच घेईल असे नाही.

[ छेदक ४ ] ( सूत्र ३.१.२ ) बद्दल– 'नक्कीच' हे पुढील दोन्ही उदाहरणांत निश्चितता दाखवणारे वाक्यविशेषण आहे—

तो नक्कीच उद्या मुंबईहून येईल.
नक्कीच तो उद्या मुंबईहून येईल.

कुणी 'तो उद्या मुंबईहून येईल का ?' असा प्रश्न विचारला, तर वरील दोन्ही वाक्ये त्याची उचित उत्तरे ठरतील. प्रश्नामध्ये गर्भित असलेली असलेली अनिश्चितता दूर करण्याचे काम 'नक्की' हे वाक्यविशेषण करील.

[ छेदक ४ ] ( सूत्र ३.१.२ ) बद्दल. खालीलप्रमाणे लिहिणे टपालखात्याच्या शिफारशीला धरून नाही.

पुणे– ३०
४११ ०३०

केवळ 'पुणे ४११ ०३०' लिहिणे पुरेसे आहे.

[छेदक ४] (सूत्र ३.२.२) बद्दल. 'काशी, रामेश्वर' इत्यादी वाक्य आगंतुक मुळीच नाही. 'काशी, रामेश्वर, प्रयाग' या परिगणनवाचक रचनेसाठी ते उदाहरण म्हणून आलेले आहे, वियोगी चिन्हासाठी ते इथे आलेले नाही.

[ छेदक ४ ] ( सूत्र ९.१ ) बद्दल. मी लिहिले आहे—

तारका चिन्हाऐवजी, उदाहरणार्थ, २ किंवा २ क देखील येऊ शकेल.

इथे मला कुठल्याही सूत्राचा हवाला द्यायचा नाही, तसा द्यायचा असता तर, मी 'सूत्र २ किंवा...' अशी शब्दयोजना केली असती. 'उदाहरणार्थ' या माझ्या शब्दाच्या मागेपुढे स्वल्पविराम आहेत ते हा शब्द मध्येच घुसवलेला निवेशित घटक आहे, हे दाखवण्यासाठी आहेत. ( सूत्र ४.१ घ ) पाहावे. प्रा. अडोणी यांच्या नजरेतून दुसरा स्वल्पविराम निसटलेला दिसतो. मी जे तुकारामाच्या अवतरणाचे उदाहरण अगोदर दिलेले आहे, त्यातली तारकाचिन्हे काढून टाकून त्यांच्या जागी १ आकडा घातला किंवा २ क हे जोडचिन्ह घातले, म्हणजे लक्षात येईल, की तळटीपा केवळ तारकाचिन्हाने दाखवीत नाहीत, तर वर्णांक–चिन्हांनीही दाखवतात. ( वर्णांकचिन्ह म्हणजे अल्फान्यूमेरिक सिंबल हे संगणकव्यवहाराशी परिचित असणारांच्या सहज लक्षात यावे. )

[ छेदक ४ ] ( सूत्र १०.३ ) बद्दल. पुढील वाक्यात 'केवळ आणि' असे अवतरणचिन्हांकित लिहिणे अजिबात प्रशस्त ठरणार नाही.

अर्धविरामाच्या जागी केवळ आणि घालता येईल, मग दुसऱ्या विरामचिन्हाची गरज नाही.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

'केवळ' हे अवतरणांचिन्हात घालायचे तर काहीच कारण नाही– प्रा. अडोणींना खुलते अवतरणचिन्ह केवळ नंतर लिहायचे असावे. आणि अवतरणचिन्हांत यासाठी घातले नाही की, तसे ते घातल्यामुळे कुणी कायदेबाज वाचकाने मग पुढील वाक्य ग्राह्य ठरवले असते!

चहा, कॉफी, किंवा थंड पेय 'आणि' वडा, समोसा, किंवा केक असा बेत ठेवू.

अशा कायदेबाज वाचकाबद्दल माझी मुळीच तक्रार नाही. कारण अशा वाचकांच्या आक्षेपांमुळेच मी सुचवलेली सूत्रे काटेकोर आहेत, की नाहीत, याचा पडताळा मिळेल; काटेकोरपणा हा जसा लेखनाचा गुण असतो, तसा वाचनाचा गुणही असू शकतो. प्रा. अडोणी यांच्या 'प्रतिसादा'चे म्हणून तर मी स्वागत करतो. जेव्हा मी सूत्रांची भाषा केली, तेव्हाच एक 'साद' घातली होती– काटेकोर वाचकांनो, माझ्या सूत्रांना सपिटाची चाळण लावा, जरूर पडली, तर पुस्ती–दुरुस्ती सुचवा.

[छेदक ४] (भेदकचिन्ह) छेदकाबद्दल. मी पायमोडीचे उदाहरण दिले आहे—

एम्. ए. (पण : पी–एच. डी.)

खरे म्हणजे ही दोन उदाहरणे आहेत. एकात म चा पाय मोडला आहे. कारण एम्. मध्ये ए ऱ्हस्व आहे व मकार दीर्घ आहे. दुसऱ्यात च चा पाय मोडलेला नाही. कारण एच मध्ये ए दीर्घ आहे व च कार ऱ्हस्व आहे. दोन्ही उदाहरणांतला हा भेद दाखवण्यासाठी मध्ये पण शब्द ठेवला. (तीच गोष्ट बेल् bell आणि बेळ bail यांची.)

जाताजाता सांगायचे, तर एम्. बी. बी. एस्. (स्वल्पविराम नाही) ही जशी जोड–पदवी आहे तशी एम्. ए., पी–एच. डी. ही जोड–पदवी नाही.

[छेदक ४, शेवटचा परिच्छेद] प्रा. अडोणी यांना जे मुद्रणदोष वाटत आहेत, ते तसे नाहीत. प्रत्येक वाक्यात क्रियापद असलेच पाहिजे, असा आग्रह वास्तव प्रयोगाला धरून नाही. वा रे वा! केव्हा? तुझं नाव काय? नक्कीच.– ही सगळी वाक्ये आहेत. सूत्रे १,३, ३.१, ३.२, ४, ५, ८ ही अधिकरणसूत्रे आहेत. उदाहरणार्थ, ३.१ चा अधिकार ३.१.१ आणि ३.१.२ पुरता आहे तर ३ चा अधिकार ३.१, ३.१.१, ३.१.२, ३.२, ३.२.१, ३.२.२ या सगळ्या सूत्रांवर चालतो. जिथे वाक्य अपुरे आहे असे दाखवायचे असेल तिथेच वियोगीचिन्ह (सूत्र ४.२ ला अनुसरून) वापरले आहे.

[छेदक ५, दुसरा व तिसरा परिच्छेद] ज्या गोष्टीला मी प्राचीन भारतीय विचारसरणीला अनुसरून लिहिणाराची विवक्षा म्हटले आहे, तिला प्रा. अडोणी 'लिहिणाऱ्याचे मतस्वातंत्र्य' म्हणतात. विवक्षा म्हणजे लिहिणारा (किंवा बोलणारा) याने आपल्याला नेमके काय संज्ञापित करायचे आहे, याबद्दल मनाशी केलेला ठराव. 'मांजराने उंदीर पकडला' आणि 'मांजराने उंदराला पकडले' ही दोन वाक्ये ढोबळ मानाने सारख्या अर्थाची वाटली, तरी त्यांच्या मागची विवक्षा वेगवेगळी आहे. (थोडा विचार केला, तर मराठी भाषकाला हा वेगळेपणा उमजेल; सुस्पष्ट शब्दांत तो सांगता येईल, की नाही, हा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

भाग निराळा.) मला जे स्वातंत्र्य अभिप्रेत आहे, ते या विवक्षेचे. कुणीही कसेही लिहावे, हे स्वातंत्र्य नव्हे.

विरामचिन्हांचे हे सर्व बारकावे मराठीत लिहिणाऱ्या सगळ्याच मंडळींच्या पत्रात, वाणसामानाच्या यादीत, औपचारिक दस्तऐवजात, गद्यलेखनात सापडतील, असे नाही. ते सर्व शाळेत शिकवावे, असेही मला वाटत नाही. जेवढे शिकवण्यासाठी निवडक काढायचे तेवढे शिकवण्यासाठी इतकी सूत्रबद्ध, पुनरुक्तिविरहित मांडणी करून चालणार नाही, हेही उघड आहे. यांतली कुठली सूत्रे आधी शिकवायची, कुठली नंतर शिकवायची, कुठली गाळली, तरी चालतील, कोणते पर्याय आधी शिकवावे, कोणते नंतर शिकवावे, कोणते गाळावेत, आणि मुख्य म्हणजे ती सूत्रे कोणत्या पद्धतीने शिकवायची, हा सर्व शैक्षणिक तारतम्याचा भाग आहे. डॉ. द. न. गोखले यांच्या लेखात या शैक्षणिक विचाराला सुरुवात केली आहे. कुणी सांगावे, एखादा कुशल भाषाशिक्षक कधी काळी या पद्धतीची पुस्तिका काढीलही. मेजर कँडी यांच्या पुस्तिकेला बराच काळ लोटला. तिच्यावर आपण इतकी वर्षे गुजराण केली. (त्याने कोलन बाजूला ठेवला, म्हणून आपणही तो बाजूला ठेवला.) मराठी भाषकाचा भाषाव्यवहार नेटका व्हावा, याची काळजी मेजर कँडीला जितकी होती, तितकी काळजी आज करणारी जी थोडी मंडळी आहेत ती **भाषा आणि जीवन** पत्रिकेच्या निमित्ताने एकत्र येत आहेत, अशी अंधूक शंका मनात येते—अगदी अंधूक!

**ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४**

# आत्याबाईच्या मिशांबद्दल आणखी थोडेसे

**सरोजा भाटे**

'भाषा आणि जीवन'च्या हिवाळा ९० च्या अंकात मा. ना. आचार्य यांचा 'आत्याबाईच्या मिशा' हा लेख वाचला. कर्मकर्तरी ही संकल्पना ज्या मूळ संस्कृत व्याकरणात सर्वप्रथम आढळते, तिथे तिचे स्वरूप काय आहे, हे समजून घेतल्यानंतरच तशा प्रकारचा प्रयोग मराठीमध्ये आहे का, हे पाहणे उचित ठरेल.

प्रारंभी संस्कृत व्याकरणातल्या काही अन्य संकल्पना लक्षात घेणे जरुरीचे आहे. संस्कृत वैयाकरणांच्या मते वाक्यात क्रिया हा प्रधान घटक असून वाक्यातील अन्य घटक निरनिराळ्या नात्यांनी क्रियेशी जोडलेले असतात. या नात्यांवरून त्या घटकांना कारकांची लेबले चिकटवली जातात. क्रियेमध्ये 'स्वतंत्र'पणे भाग घेणाऱ्या कारकाला कर्ता म्हणतात, तर ज्याला उद्देशून कर्ता क्रिया करतो किंवा क्रियेच्या फळाचा जो आश्रय असतो, त्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कारकाला कर्म म्हणतात. कर्त्याखेरीज अन्य सर्व कारके परतंत्र, कर्त्यावर अवलंबून असतात.

कर्तरी, कर्मणी आणि भावे या तीन प्रयोगांखेरीज आणखी एक प्रयोग संस्कृत भाषेत आढळतो. तो म्हणजे कर्मकर्तरी– यांची उदाहरणे पुढीलप्रमाणे :

१. कर्तरी :- देवदत्तः ओदनं पचति– देवदत्त भात शिजवतो.

२. कर्मणी :- देवदत्तेन ओदनः पच्यते– देवदत्ताकडून भात शिजवला जातो.

३. कर्मकर्तरी :- ओदनः पच्यते– भात शिजतो.

४. भावे :- देवदत्तेन आस्यते– देवदत्ताकडून बसले जाते.

यांपैकी भावे प्रयोगाशी आपल्याला तूर्तास कर्तव्य नाही. उरलेल्या तीन प्रयोगांपैकी १ आणि २, यांचा आशय तंतोतंत सारखा आहे. (संस्कृत वैयाकरणांनी या दोन प्रयोगांच्या शाब्दबोधात केलेला सूक्ष्म फरक ध्यानात घ्यायची इथे आवश्यकता नाही.) एकाच आशयाचे कर्तरी आणि कर्मणी प्रयोग म्हणजे एकाच नाण्याच्या दोन बाजू असतात. २ आणि ३ यांमध्येही बरेच साम्य आहे. २ मधील 'देवदत्तेन' हा शब्द वगळला, की दोहोंत तंतोतंत साम्य आहे, असे वाटते. परंतु हे साम्य वरवरचे आहे. त्यांचे आशय भिन्न आहेत. २ मध्ये सांगितलेल्या क्रियेत 'स्वतंत्र' किंवा कर्ता या भूमिकेत देवदत्त सहभागी झालेला आहे. तो कृतीत सहभागी आहे, म्हणून वाक्यातही त्याची उपस्थिती आहे. ३ मध्ये मात्र तो कृतीतही नाही. म्हणून वाक्यातही अनुपस्थित आहे, आधणात तांदूळ वैरून, इंधन सारखे करून आणि झाकण ठेवून देवदत्त आंघोळीला गेला आहे. अशा वेळी चुलीवर भात आपोआप शिजतो, असा ३ चा आशय आहे. १ व २ या वाक्यात ओदन (भात) कर्म आहे; शिजण्याच्या क्रियेचे फळ जी विक्लित्ती, (मऊ होणे) तिचा तो आश्रय आहे आणि तो देवदत्तावर अवलंबून, परतंत्र आहे. उलट, ३ मध्ये ओदन देवदत्तावर अवलंबून नसल्यामुळे स्वतंत्र आहे, म्हणून तो कर्ता आहे. परंतु त्याच वेळी तो शिजण्याच्या क्रियेच्या फळाचा–विक्लित्तीचा आश्रयही आहे, म्हणून तो कर्मही आहे. अशा रीतीने ३ मधील ओदन कर्मकर्ता आहे. कर्म आणि कर्ता असे दोन्ही धर्म एकाच कारकात एकवटलेले असतात, तेव्हा त्याला कर्मकर्ता म्हणायचे. वाक्यातील क्रियापद कर्मकर्त्याप्रमाणे चालते, म्हणून अशा प्रयोगाला कर्मकर्तरी प्रयोग म्हणतात.

वरील विवेचनावरून कर्मकर्तरी प्रयोगाची पुढील वैशिष्ट्ये लक्षात येतात. :

(१) क्रियापदाचे रूप कर्मकर्तरी आणि कर्मणी प्रयोगात तंतोतंत सारखे असते.

(२) कर्तरी आणि कर्मणी प्रयोगांत कर्ता आणि कर्म दोघेही क्रियेत सहभागी झालेले असतात. (क्वचित एखाद्याला बोलताना कर्माची विवक्षा नसेल, तर तो 'देवदत्तेन पच्यते' एवढेच म्हणाला तरीही साक्षात क्रियेत कर्म सहभागी असल्यामुळे [पच् हा सकर्मक धातू आहे.] वाक्यात कर्म अध्याहृत घ्यावे लागते), तर कर्मकर्तरी प्रयोगात



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कर्म आणि कर्ता या दोन्ही भूमिका एकच कारक बजावत असल्यामुळे त्याहून निराळा कर्ता किंवा कर्म असत नाही.

( ३ ) कर्तरी व कर्मणी प्रयोगांत कर्ता क्रिया करीत, घडवीत असतो, तर कर्मकर्तरी प्रयोगात ती आपोआप 'घडत' असते. या क्रियेचा कर्ता क्रिया हा 'करणारा' नसून ती क्रिया 'भोगणारा', सोसणारा असतो.

( ४ ) कर्तरी आणि कर्मणी प्रयोगांत कर्ता कशाला तरी उद्देशून क्रिया करीत असतो, तर कर्मकर्तरी प्रयोगात कर्त्याला स्वतःहून भिन्न उद्देश्य नसतो, क्रियेचा फळाचा आश्रयही तोच असतो, म्हणून वाक्यात कर्माचीही भूमिका त्याला पार पाडायची असते, अशा तऱ्हेने बाह्य विश्वात 'आपोआप' घडणाऱ्या काही क्रियांचे विश्लेषण कर्मकर्तरीच्या संकल्पनेतून करण्याचा प्रयत्न संस्कृत वैयाकरणांनी केला आहे. वरवर पाहता असे वाटेल, की कर्त्याने एखादी क्रिया आरंभल्यानंतर काही काळाने त्याच्या सहभागाशिवाय, प्रत्यक्ष उपस्थितीशिवाय सुद्धा अन्य परिस्थिती अनुकूल असताना क्रिया जेव्हा आपोआप घडू लागते, तेव्हा कर्मकर्तरी प्रयोगाला अनुकूल आशय तयार होतो. म्हणजेच कर्मकर्तरी प्रयोग जन्माला येण्याआधी कर्तरी /कर्मणी प्रयोग जन्माला यावे लागतात.

परंतु हे खरे नाही. विश्वात किती तरी क्रिया स्वभावतःच आपोआप घडत असतात. त्यांना एखाद्या कर्त्याने आरंभ केल्याची पार्श्वभूमी नसते. प्रा. अर्जुनवाडकर यांनी दिलेल्या 'भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः' या उदाहरणावरूनही ही गोष्ट स्पष्ट होते. हृदयाची गाठ आपोआप उकलते, संशय आपणहून फिटतात, असा अर्थ इथे अभिप्रेत आहे. गाठ उकलणारा किंवा संशय फेडणारा कोणी प्रारंभी होता आणि आता त्याच्या अनुपस्थितीतही हे घडते, असा भावार्थ इथे अभिप्रेत नाही. देवदत्ताने भात शिजवण्याच्या क्रियेवर आधारलेल्या तीन प्रयोगांच्या वरील उदाहरणात कर्तरी / कर्मणी आणि कर्म-कर्तरी यांमध्ये पौर्वापर्य आढळत असले तरी ते कर्मकर्तरीचे वैशिष्ट्य मानता येणार नाही. अशा प्रकारचे पौर्वापर्य पाणिनीच्या टीकाकारांनी गृहीत धरून कर्मकर्तरीचे वर्णन केले असले, तरी पाणिनीला ते अभिप्रेत होते, असे दिसत नाही. पाणिनिपूर्व वाङ्मयात निखळ कर्मकर्तरी प्रयोगाची उदाहरणे कितीतरी आढळतात. एक-दोन उदाहरणे पाहू या.

अहिस्त्वचः निर्मुच्यते 'साप कातीतून मोकळा होतो.'

तस्मादग्निः असृज्यत 'त्यातून ( घर्षणातून ) आग निर्माण झाली', साप कात टाकतो. तेव्हा बिळातून बाहेर यावे, तसा तिच्यातून तो बाहेर येतो. त्याला कातीतून मोकळा करणारा कोणी नसतो. तोच मोकळा होतो. दोन लाकडांच्या घर्षणातून आग पेटते. तिला पेटवणारा कोणी असत नाही.

या उदाहरणांवरून लक्षात येईल, की 'आपणहून घडणे' हा कर्मकर्तरी प्रयोगातील क्रियेचा विशेष आहे आणि पूर्वी घडवणारा होता आणि नंतर त्याच्या अनुपस्थितीत क्रिया घडते, असे पौर्वापर्य इथे अभिप्रेत नाही.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कर्मकर्तरी प्रयोगाचे आणखी एक वैशिष्ट्य इथे लक्षात घ्यायला हवे. ते म्हणजे, ज्याप्रमाणे कर्तरी आणि कर्मणी हे प्रयोग एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत, परस्परांचे अस्तित्व सूचित करणारे आहेत, तसा कर्मकर्तरी प्रयोगाला समांतर जोडीदार नाही. तो एकटा आहे, स्वतंत्र आहे. कारण दोन्ही प्रयोगांची वैशिष्ट्ये त्यात एकवटलेली आहेत. म्हणून संस्कृत भाषेतील कर्मकर्तरी प्रयोग म्हणजे खरोखरच आत्याबाईंना मिशा फुटल्याचा चमत्कार आहे.

पाणिनि आणि त्याच्या अनुयायांनी हा वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग सांगितला, तो संस्कृत भाषेत आढळणाऱ्या काही वैशिष्ट्यपूर्ण वाक्यांची उपपत्ती लावण्यासाठी. वर उदाहरणादाखल दिलेल्या वाक्यांचा समावेश कर्तरी, कर्मणी किंवा भावे यांपैकी कोणत्याही प्रकारात करणे शक्य नाही, तसेच क्रियापदाचे रूप कर्माप्रमाणे चालते, परंतु कर्म ज्यावर अवलंबून असते, असा स्वतंत्र कर्ता अस्तित्वात नाही, अशा परिस्थितीत दुहेरी भूमिका बजावणाऱ्या एकाच कारकाची, कर्मकर्त्याची, संकल्पना पाणिनीने कर्मवत् कर्मणा तुल्यक्रियः (पा. ३.१.८७) ' कर्माप्रमाणे क्रिया असणारा कर्ता कर्मासारखाच (मानला जातो). ' या सूत्रात मांडली.

शेवटी आणखी एक मुद्दा लक्षात घ्यायला हवा. या प्रयोगाला कर्मकर्तरी म्हटले जाते. ' कर्तृकर्मणी ' नाही. म्हणजे दुहेरी भूमिका बजावणारे कारक हे कर्ता आहे, कर्म नाही. कर्माप्रमाणे वागणारा कर्ता (कर्त्याप्रमाणे वागणारे कर्म नव्हे.) इथे दिसतो. म्हणून कर्म-कर्तरी हा कर्तरी प्रयोगाचा विशेष प्रकार आहे. काही पाश्चात्त्य agentless passive ' अकर्तृक कर्मणी ' असे याचे वर्णन करतात. ते बरोबर नाही. कर्म हे परतंत्र कारक आहे. कर्त्याच्या अस्तित्वावर त्याचे अस्तित्व अवलंबून असते, त्यामुळे ' अकर्तृक कर्मणी ' ही संकल्पनाच संभवत नाही. म्हणून याला कर्मणी प्रयोगाचा उपप्रकार न मानता, कर्तरी प्रयोगाच्या reflexive ' आत्मकर्मक ' या प्रकाराच्या अत्यंत जवळचा उपप्रकार मानणे अधिक उचित ठरेल.

संस्कृत भाषेतील कर्मकर्तरी प्रयोगाची ही ठळक वैशिष्ट्ये ध्यानी घेतल्यानंतर आता मराठीत अशा प्रकारचा प्रयोग आढळतो का, हे पाहायचे. उदाहरणादाखल काही वाक्ये पाहू या.

(इंधन संपल्यामुळे) आग विझते.
झाडावरून फळ (गळून) पडते.
तव्यावर भाकरी भाजते.
दगड पाण्यात बुडतो.
कागद पाण्यावर तरंगतो.
चुलीतले लाकूड जळते.

वरील वाक्यांतील सर्व क्रिया आपणहून घडणाऱ्या आहेत. विझवणारा, भाजणारा,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

बुडवणारा, तरंगवणारा आणि जाळणारा अन्य कर्ता या ठिकाणी नाही. उलट, अन्य संदर्भात. उदा.

अग्निशामकदल आग विझवते.

किंवा,

बंड्या झाडावरील फळे पाडतो.

अशा ठिकाणी अन्य कर्ता असू शकतो. वरील वाक्यांतील आग, फळ, भाकरी, दगड, कागद आणि लाकूड हे घटक त्या त्या क्रियांची कर्मे आहेत. कारण त्या त्या क्रियांपासून निष्पन्न होणाऱ्या फळांचे ते आश्रय आहेत, परंतु ही कर्मे अन्य कोणत्याही कर्त्याची उद्देश्ये नाहीत. त्यांना उद्देशून क्रिया करणारा बाह्य कर्ता अस्तित्वात नाही, म्हणून कर्त्याची भूमिकाही तीच पार पाडीत आहेत. म्हणून संस्कृत-व्याकरणाचे निकष लावले, तर वरील प्रयोगांना कर्मकर्तरी प्रयोग म्हणता येईल.

थोडक्यात सकर्मक धातूने सांगितलेली क्रिया जेव्हा स्वतंत्र कर्त्याविना कर्मावर आपोआप घडत असते, तेव्हा अशी क्रिया सांगणाऱ्या वाक्यात कर्मकर्तरी प्रयोग असतो. प्रा. अर्जुनवाडकर यांनी या प्रयोगाचे केलेले विवेचन आणि दिलेले संस्कृत उदाहरण (आचार्य यांनी आपल्या लेखात उद्धृत केलेले पृ. १६ आणि १७) बरोबर असले, तरी मराठीतील

मला हरबरे चावतात

तसेच गो. कृ. मोडक यांनी दिलेले (पृ. १६ वर उद्धृत केलेले.)

मला दार उघडते

ही दोन्ही उदाहरणे वरील निकष लावल्यानंतर कर्मकर्तरी प्रयोगाची उदाहरणे मानता येणार नाहीत, कारण दोहोंमध्ये मी हा कर्ता आणि हरबरे। दार हे कर्म यांचे स्वतंत्र अस्तित्व आहे. माझ्या मते हे दोन्ही प्रयोग कर्मणी असून (कारण इथे कर्माप्रमाणे क्रियापद चालते) 'माझ्याकडून' याऐवजी 'मला' हे कर्त्याचे वैकल्पिक रूप आहे. तसेच 'चावले जातात' आणि 'उघडले जाते' यांऐवजी 'चावतात' आणि 'उघडते' ही ताख्याती रूपे सहायक क्रियापदाशिवाय येतात.

अशा प्रकारे अर्थदृष्ट्या मराठीत कर्मकर्तरी प्रयोग संभवत असला, तरी रूपदृष्ट्या त्याला स्वतंत्र प्रयोग म्हणून मानता येईल, का कर्तरी किंवा कर्मणी यांपैकी एकात त्याचा समावेश करावा लागेल, याचा विचार करणे आवश्यक आहे. आचार्य यांनी आपल्या लेखात (पृ. १७) म्हटल्याप्रमाणे संस्कृतमध्ये 'केवळ क्रियापदाच्या रूपावरूनही वाक्याचा प्रकार सांगता येतो', हे बहुतांशी खरे असले, तरी कर्मकर्तरी प्रयोगाच्या बाबतीत मात्र रूप आत्याबाईचे आणि करणी मिशांची, अशी स्थिती आहे, हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. त्यामुळे 'प्रयोग सांगताना दिलेल्या प्रत्येक वाक्याचा विचार स्वतंत्रपणे करावा लागतो' हा आचार्य यांचा मुद्दा (पृ. १९) लक्षात घेऊन रूप आणि आशय या दोहोंच्या संयुक्त निकषांवर वर दिलेल्या उदाहरणांना आणि मराठीत आढळणाऱ्या तत्सम



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अन्य उदाहरणांना कर्मकर्तरी मानता येईल, असे मला वाटते.

जाता जाता आचार्य यांनी मराठी प्रयोगव्यवस्थेच्या सांगितलेल्या एका वैशिष्ट्यासंबंधी थोडा खुलासा होणे आवश्यक आहे, असे वाटते. 'धातूचे प्रथम ताख्याती रूप ज्याला अनुसरते, तो कर्ता', असे आचार्य म्हणतात. (पृ. १९) आणि 'मला हरबरे चावतात' या वाक्यात चाव (व) धातूचे प्रथम ताख्याती रूप हरबरे या शब्दाला अनुसरते म्हणून 'मला हरबरे चावतात' हा अकर्मक कर्तरी प्रयोग आहे, असा युक्तिवाद (पृ. १६ व १८) ते मांडतात. हाच युक्तिवाद मांडून 'तिला साप चावला' हा त्यांनी कर्मणी प्रयोगाचे उदाहरण म्हणून उद्धृत केलेला प्रयोगही (पृ. १७) सकर्मक कर्तरी मानता येईल. वास्तविक वाक्याच्या आशयावरून एकदा कर्म आणि कर्ता निश्चित केल्यानंतर वाक्यातील ताख्याती रूप कर्त्याप्रमाणे चालत असेल, तर तो कर्तरी प्रयोग आणि कर्मा-प्रमाणे चालत असेल, तर तो कर्मणी प्रयोग, अशी कल्पना करून प्रयोगनिश्चिती करणे सोपे होईल, असे वाटते. यानुसार 'तिला साप चावला' आणि 'मला हरबरे चाव(व)-तात' ही दोन्ही वाक्ये कर्मणी या एकाच गटात जातील.

संस्कृत विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११००७.

## 'साउलें'

**लीला अर्जुनवाडकर**

**भाषा आणि जीवन**च्या हिवाळा १९९० च्या अंकात 'देशीकार लेणे' या शीर्षकाने डॉ. पंडित आवळीकर व डॉ. विजया तेलंग यांनी महानुभाव वाङ्मयातील संदर्भ देऊन 'साउलें' या शब्दावर टिपण लिहिले आहे. या बाबतीत पाली भाषेतील एका शब्दाची माहिती उद्‌बोधक ठरेल.

पाली भाषेत 'साहुळचीवर' असा सामासिक शब्द आढळतो. ['साहुळिचीर' असाही एक पाठ असल्याचे मला अंधूक स्मरते. ऱ्हीस डेव्हिड्सने आपल्या पालि-इंग्लिश कोशात 'साहुळि' असा प्राकृत शब्द असल्याचीही नोंद केली आहे.] 'चीर' किंवा 'चीवर' म्हणजे 'वस्त्र' हे प्रसिद्धच आहे. मराठीतही 'पोटचीर', 'चिरगूट' या शब्दांत तो शब्द शिल्लक आहे. ऱ्हीस डेव्हिड्सने आपल्या कोशात 'साहुळचीर' याचा अर्थ 'a coarse cloth' असा देऊन मज्झिमनिकाय, देशीनाममाला व कर्पूरमंजरी यांचे हवाले दिले आहेत. या शब्दाच्या अर्थाची चर्चा करणाऱ्या दोन जुन्या लेखांचाही संदर्भ त्यांनी दिला आहे.

माझ्या स्मृतीप्रमाणे मज्झिमनिकायाच्या इंग्रजी भाषांतरात या शब्दाचा अर्थ 'मळके, कळकट वस्त्र' असा केला आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

'साहुल' असा एक शब्द मोनियर विल्यम्सने आपल्या कोशात नोंदवला आहे व त्याचा अर्थ देताना 'Name of a man (?)' असा केवळ तर्क केला आहे. त्याचा हवाला 'कॅटलॉग'चा आहे.

'साउले' या शब्दाचा 'सोवळे' या शब्दाशी संबंध असणे शक्य दिसते. तसेच वरील टिपणाच्या लेखकांनी सुचविलेल्या 'शेला' या शब्दाप्रमाणे 'शाल' या शब्दाशीही 'साउले' याचा लागाबांधा जुळणे शक्य आहे. याच संदर्भात 'शालू' घेण्याचाही विचार करायला हरकत नाही.

सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे ४११ ०३०

## इंग्रजीतील 'do an arrangement' आणि 'few'

**गौरी देशपांडे**

"पत्रिकेचा वर्ष ८ : अंक २ : उन्हाळा १९९० चा अंक नुकताच वाचण्यात आला. त्यातील पृ. ११ व १२ वर चुकीचे इंग्रजी म्हणून जी उदाहरणे दिली आहेत त्यामध्ये २ खरे पाहता चुकीची नाहीत. पृष्ठ ११ वरील उदाहरण ३० हे विशिष्ट प्रसंगी बरोबर असते. उदा. She is in charge of doing the flower arrangemants in ths hotel. पण सर्वसाधारणपणे 'do an arrangement' हे चूकच आहे. म्हणून हे उदा. फारसे आक्षेपार्ह नाही, परंतु पृ. १२ वरल्या उदा. ३८ याबद्दल असे म्हणता येणार नाही. He Scored few runs हे सर्वस्वी बरोबर आहे. इंग्रजीत 'few'. 'a few' किंवा 'very few' वाचून, याचा अर्थ 'almost none' असा होतो. वरील उपयोग : Wh had enpected great things of this batsman but he scored few runs येथे किंवा He Scored few runs but was useful to the team in the autfield येथे संपूर्णतया बरोबर आहे. ही पुरवणी अशा अभ्यासू लेखाला जरूर हवी."



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# मराठी शब्दरूपांमधली काही संदेह स्थळे

अशोक रा. केळकर

कोणतीही भाषा जीवंत असते, तेव्हा ती दर पिढीला, किंबहुना सतत, बदलत असते. मात्र ती कधीही इतकी बदलत नाही, की या बदलामुळे आजोबा-आजी आणि त्यांची नातवंडे यांना एकमेकाचे समजायला अडचण पडावी. पुष्कळदा बदलाच्या संधिकाळात जुना आणि नवा पर्याय दोन्ही एकत्र नांदतात. कधी हे विकल्प म्हणून स्वीकारले जाऊ शकतात. तर कधी एक पर्याय हळूहळू बाजूला सारला जातो. तर कधी मंडळी बुचकळ्यात पडतात, म्हणजेच एक संदेहस्थळ उत्पन्न होते. भाषेच्या शब्दयोजना, वाक्यरचना अशा विविध अंगांत संदेहस्थळे दिसत असली, तरी सध्या आपल्याला विचार करायचा आहे, तो केवळ विकारी शब्दांच्या विशिष्ट रूपांबद्दलच्या संदेहस्थळांपुरता मर्यादित राहील.

## नामांचे विकार

मराठीत नामांची सामान्यतः चार रूपे होतात आणि ती रूपे कशी होतात, हे नामांच्या गणांना धरून ठरते. (त्यांची मी अन्यत्र थोड्या तपशिलाने चर्चा केली आहे, **वैखरी**, मुंबई १९८३, पृ. २३१-५.)

पुंलिंगी १ घोडा, घोड्या, घोडे, घोड्यां-
पुं. २ वाघ, वाघा-, वाघ, वाघां-
स्त्रीलिंगी १ घोडी, घोडी-, घोड्या, घोड्यां-
स्त्री. २ शाळा, शाळे-, शाळा, शाळां-
स्त्री. ३ वाट, वाटे-, वाटा, वाटां-
स्त्री. ४ भिंत, भिंती-, भिंती, भिंतीं-
नपुंसकलिंगी १ घोडं, घोड्या-, घोडी, घोड्यां-
न. २ झाड, झाडा-, झाडं, झाडां-

काही नामांचा एक अल्पविकारी गण मानावा लागतो. उदाहरणार्थ, पुं. काका, झाडू, हत्ती; स्त्री. सुवासिनी, देवी, दुपार, दारू; न. मुकाणू. यांना अल्पविकारी का म्हणायचे, ते या नमुन्यावरून सहज ध्यानात यावे.

पु. ० हत्ती, हत्ती-, हत्ती, हत्तीं-

या चार रूपांपैकी दुसऱ्या आणि चवथ्या रूपांपुढे ने, ला, शी, हून, निशी, च्याने यांसारखे प्रत्यय किंवा चा, कडला, जोगता, पुरता, आतला, सारखा, कडील, आतील,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद
अनुक्रमणिका

विरुद्ध यांसारखी उत्तरयोगी विशेषणे किंवा सकट, खातर, अपेक्षा, गत, मुळे, आत, आतून, आड, जवळ, शिवाय यांसारखी उत्तरयोगी क्रियाविशेषणे लागतात. हे उत्तरयोगी लागताना त्यांच्या सुरुवातीचा स्वर कधी गळतो ( उदाहरणार्थ : अनुसार, आतला, अपेक्षा, आत ), तर कधी टिकून राहतो ( उदाहरणार्थ : आड, अगोदर, उलट ). नाम बहुवचनी असले, तर ने ऐवजी नी, आणि ला ऐवजी विकल्पाने ना येते. ( घोड्यान्‌ला याचा संधी घोड्यान्ना होतो, असे आपण म्हणू या. ) एकवचनी ने बद्दल नं आणि कधी तर नी हाही पर्याय आढळतो, आणि हे दोन्ही पर्याय लेखनात येऊ पाहत आहेत. ( ला, ना, ने, नी यांचे स्वरविरहित उच्चारही होतात. )

काही संदेहस्थळे : ( १ ) कुणाला संबोधन करण्यासाठी सामान्यतः दुसरे, तिसरे, चवथे रूप वापरून पुढील मार्ग निघू शकतात—

घोड्या ( रे ), घोडे ( हो ), घोडयांनो (घोडयां–आणि हो यांचा संधी ) स्त्री. १ गणाची स्थिती थोडी वेगळी आहे,

घोडे ( ग ), घोडया ( हो ), घोडयांनो

एक नवा पर्यायही पुढे येतो आहे– घोडी ( ग ). आई, बाई यांसारख्या नामांत तर तोच प्रशस्त मानला जातो. तुलना करा —आई ( ग ), आये ( ग ).

( २ ) न. १ गणाचे पहिले रूप आणि न. २ गणाचे तिसरे रूप यांबद्दल बदल दिसतो. घोडं, झाडं ही रूपे घोडे, झाडे या रूपांची जागा आता लेखनातही सरसकट घेताना दिसतात.

( ३ ) काही नामे कोणत्या गणामध्ये पडतात, याबद्दल विकल्प आहे. ( पारंपरिक पर्याय प्रथम दिला आहे. )

न. २ / पु. २ गाव
न. २ / न. ० कॉलेज
पु. २ / पु. ० अशोक, केळकर
स्त्री. ४ केळकरीण / स्त्री. ० केळकर
पु. १ मुलगा / न. २–, मुला, मुलं, मुलां– (उदा., मुलंमुली )
स्त्री. ३ / न. ० मिरज, अहमदाबाद
स्त्री. २ / स्त्री. ० गीता, सीता, आशा ( स्त्रीनामे म्हणून )
स्त्री. ३ / स्त्री. ० सासू, जाऊ, टाळू, ऊ, बाजू
पु. २ माणूस, माणसा–,–,– / न. २ –,–, माणसं, माणसां–
स्त्री. ० । स्त्री. १ श्रेणी, सूची, प्रकृती, प्रवृत्ती
पु. १ । पु. ० जखमी, खुनी

काही वेळा मंडळी दोन्ही पर्यायांचा संकर करतात (मुलगा, माणूस ही उदाहरणे पाहावीत. )



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

(४) उलटपक्षी, अशा विकल्पांचे पर्यवसान काही नामांच्या बाबतीत अर्थभेदात होते.

पाटलीण स्त्री. ४ (पाटलाची बायको) / स्त्री. ० पाटील
(पाटील आडनावाची मुलगी, बाई)
मंडळी स्त्री. १ (कंपनी) / न. ० (लोक, बहुवचनी)
आई स्त्री. १ (माता) / स्त्री. ० (आदरार्थी निर्देशक)
बाई स्त्री. १ (श्रमिक स्त्री, व्यावसायिक गायिका, रखेली; पुलिंगी प्रति-
संवादी गडी, बुवा, ठोल्या) / स्त्री. बाई, बाई, बायका,
बायका– (स्त्री; पुंलिंगी प्रतिसंवादी पुरुष, बुवा, बाप्या) /
स्त्री–बायको, बायको–, बायका, बायकां/– (पत्नी;
पुंलिंगी प्रतिसंवादी नवरा (इथे संकर व अर्थभेद दोन्ही.)
बैठक. स्त्री–४ (आसन) / स्त्री. ३ (व्यायामाचा प्रकार)

(५) स्त्रीपुरुषसंमिश्र अशा समुदायाचा निर्देश करताना लिंग कोणते वापरायचे याबद्दल संदेह आढळतो. पारंपरिक नपुंसकलिंगी बहुवचनाच्या जागी पुंलिंगी बहुवचन येऊ पाहात आहे.

नवरा बायको आली. / नवराबायको आले.
नवराबायको उभी होती. / नवराबायको उभे होते.
आई आणि बाप दोघंजणं आली. / आईबाप दोघेजण आले.
ज्ञानेश्वरांची मातापितरे / ज्ञानेश्वरांचे मातापिता.
बोका आणि मांजरी पहाटे भांडत होती. / भांडत होते.

तसे पाहिले, तर स्त्री-पुरुषसमतेचा आधुनिक विचार घेतला, तर पारंपरिक पर्यायच (नपुंसकलिंगी बहुवचन) तर्कसंगत दिसतो!

(६) आदरार्थी बहुवचनी रूप हे खरे तर साध्या बहुवचनासारखेच असायचे.

चार मास्तरांच्या बदल्या झाल्या.
राजे मास्तरांची बदली झाली.

त्यामुळे अर्थाबद्दल उत्पन्न होणारा संदेह संदर्भामुळेच दूर होऊ शकेल.

मास्तरांची बदली झाली.

म्हणजे एका मास्तरांची किंवा अनेक मास्तरांची? आणि या अनेक मास्तरांचा उल्लेख आदरार्थी समजायचा किंवा साधा समजायचा?

गडकरी आणि खाडिलकर हे त्या पिढीचे दोन थोर नाटककार.

काही नामांच्या बाबतीत मात्र मराठी भाषा ही गैरसोय दूर करते. अशा एका उदाहरणाचा उल्लेख वर (३) खाली आलाच आहे.

मुलांना घरी न्यायला सगळ्या आया आल्या होत्या.
मुलांना घरी आणायला आई स्वतः गेल्या होत्या.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

आणखी एक उदाहरण द्यायचे, तर–

आमच्या स्वयंपाकाच्या बाईला / बाईंना उपास होता.

केशरबाईचं गाणं स्मरणीय झालं.

बायकांचा / बाईंचा स्वभाव हळवा वाटतो.

तीच गत पत्नी, मामी, काकू, मावशी यांची. काही नामांच्या बाबतीत मध्येच दुसरे एखादे नाम आड घातले जाते.

सासवा / सासूबाई गावाहून आल्या.

डॉक्टर लोकांना / डॉक्टर साहेबांना हे पटणार नाही.

पाटलिणींना / पाटलीणबाईंना बोलावलं.

पाटीलबाईला / पाटीलबाईंना काढून टाकलं.

असे दुसरे नाम आड न घातले तर अर्थ स्पष्ट होत नाही.

पाटीलचा पाटलाचा । यात दोष नाही.

'पाटीलचा' म्हणजे पुरुष किंवा स्त्री? 'पाटलाचा' म्हणजे पाटील नावाच्या पुरुषाचा किंवा गावच्या पाटलाचा?

कार्यक्रमाचे सादरकर्ते / संचालक अजून आले नव्हते.

कार्यक्रमाच्या सादरकर्त्या / संचालिका अजून आल्या नव्हत्या.

ही दोनही उदाहरणे 'मास्तरांची बदली झाली.' या उदाहरणाप्रमाणेच संदेहजनक आहेत. सुदैवाने संदर्भ पुष्कळदा उपयोगी पडतो. लोक किंवा मंडळी ही नामे आड घेऊन पुंलिंगी पदनामांबद्दल काही सोय होऊ शकते. व्यक्तिनामांना अल्पविकारी गणात ढकलणे आणि राव, पंत, ताई, बाई यांचा वापर न करणे या प्रवृत्ती हल्ली नव्या पिढीच्या बोलण्यात दिसतात. यामुळे नव्या पिढीच्या लोकांकडून पुढीलसारखे प्रयोग कमी ऐकू येतात.

अशोकाला / सवितेला बोलाव.

अशोकरावांना / सविताताईंना बोलाव.

त्याऐवजी असे प्रयोग ऐकू येतात :

अशोकला/सविताला बोलाव.

अशोकना / सवितांना बोलाव.

यामुळेच की काय, 'जी' पदाचा आदरार्थी उपयोग हल्ली ऐकू येतो.

अशोकजींना / संचालकजींना बोलावलं का?

पण संचालिकाजी, ललिताजी इथपर्यंत आपण अजून तरी आलेलो नाही! सादरकर्ताजी, सादरकर्त्रीजी यांचाही प्रयोग मी ऐकला नाही.

(७) सादरकर्त्री या शब्दावरून आणखी एका संदेहस्थळाची आठवण होते. वास्तविक हा विषय नामविकाराच्या कक्षेत येत नाही, पण ओघाने आला आहे, म्हणून त्याच्याकडे नजर टाकून पुढे जाऊ. संस्कृतवरून घेतलेल्या किंवा मुळात संस्कृतमध्ये नसलेल्या पण



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

संस्कृतवरून घेतलेल्या नामांच्या बाबतीत मराठीभाषकांचे धोरण काहीसे धरसोडीचे आहे. ('सादरीकरण', 'सादरकर्ता हे शब्द संस्कृत भाषेला ठाऊक नाहीत.) पुढील उदाहरणांत प्रथम पुलिंगी नाम, नंतर त्याचे संस्कृतमधले स्त्रीलिंगी रूप, आणि शेवटी मराठीत रूढ असलेले स्त्रीलिंगी रूप असा क्रम ठेवला आहे.

नर्तक—नर्तकी—नर्तिका/नर्तकी
संन्यासी—संन्यासिनी—संन्याशीण/संन्यासिनी
कवी—? —कवयित्री
लेखक—? —लेखिका / स्त्रीलेखक / लेखकस्त्री
जन्मदाता— जन्मदात्री— जन्मदात्री / जन्मदाती
रचयिता — रचयित्री — रचयित्री
अनुवादक— ? — अनुवादक / अनुवादिका
संपादक— ? — संपादक / संपादिका
वक्ता— वक्त्री— वक्ती
रुग्ण— रुग्णा— रुग्णस्त्री
ग्रंथकर्ता— ग्रंथकर्त्री— ग्रंथकर्ती / ग्रंथकर्त्री

वरील उदाहरणांत काही पर्याय वापरात दिसत असूनही अगदीच टाकाऊ म्हणून वगळले आहेत– कवियत्री, स्त्रीलेखिका.

स्त्रीपुरुषसमतेचा विचार केला, तर ज्या ठिकाणी स्त्रीत्वाची जाणीव सहज बाजूला पडते, त्या ठिकाणी वेगळ्या स्त्रीलिंगी रूपाची गरज दिसत नाही. उदाहरणार्थ अनुवादक, समर्थक, कर्मचारी, कलावंत, चित्रकार, संपादक, वक्ता. ज्या ठिकाणी ती सहज बाजूला ठेवता येत नाही, तिथे वेगळ्या स्त्रीलिंगी रूपाची तरतूद करावी लागेल. उदाहरणार्थ, नर्तक, गायक, जन्मदाता, परिचारिका, नायिका, नटी, डॉक्टरीण.

कुटुंबातला कर्तापुरुष, वेश्या, किंवा परित्यक्ता या संकल्पनाच मूळ पुरुषप्रधान समाजातल्या. आज 'कर्ता' शब्द 'अनुवादक' सारखा वापरावा, हे ठीक दिसते. ('न करत्याचा वार', 'करताकरविता' यामधले 'करता' हे पद निवळ मराठी; संस्कृतमधून आलेल्या 'कर्ता' शब्दाशी त्यांचा संबंध दिसत नाही.)

स्त्रीत्वाची जाणीव बाजूला ठेवता येते किंवा नाही, हा निकष पुढील मराठी जोड्यांनाही लावता येईल–– भिकारी, भिकारीण; भाजीवाला, भाजीवाली; पण खेळाडू, जखमी, पिंजारी, दमेकरी, शेतकरी.

अमक्याची पत्नी या अर्थीचे मैत्रीण, वकिलीण वगैरे शब्द सर्वच बायकांना आवडत नाहीत. तीच स्थिती मंत्री, वकील वगैरे असणाऱ्या बायकांची. डॉक्टरणीची गोष्ट थोडी निराळी आहे, हे आपण पाहिलेच आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

## सर्वनामांचे विकार

सर्वनामांच्या रूपांची अशी स्थिती आहे, की जितकी सर्वनामे, तितके गण, असे कुणी म्हटले, तर ते अगदीच वावगे ठरू नये! पण त्यातल्या त्यात स्थूलमानाने विचार केला, तर त्यांचे चार गण पडतात, असे म्हणता येईल.

पुं- स्त्री. १ मी, आम्ही, तू, तुम्ही
पुं- स्त्री. २ आपण, स्वतः / स्वता
पुं- स्त्री- न. १ कोण, काय, कोणी / कुणी, काही
पुं- स्त्री- न. २ हा, तो, जो

सर्वनामांच्या रूपांच्या तपशिलात जाण्याची इथे फारशी गरज नाही. आपण फक्त संदेह-स्थळांची नोंद करू.

**काही संदेहस्थळे :** (१) पुं-स्त्री. १, २ या दोन गणांतल्या सर्वनामांच्या पुढे ने प्रत्ययाचा लोप होतो. तीच स्थिती कोणी/कुणी या पुं-स्त्री- न. १ गणातल्या सर्वनामाची आहे.

तो जावा, ती जावी / त्याने जावं, तिने जावं
कोण जावा? कोण जावी? / कुणी जावं? ('ने' ऐवजी 'ई' येतो.)

परंतु-

आपण यावे (त), आपण याव्या(त) / आपण यावं
मी जावा, मी जावी / मी जावं
तुम्ही जावे, तुम्ही जाव्या / तुम्ही जावं
कुणी जावा, कुणी जावी, कुणी जावं / कुणी जावं

नव्या पिढीच्या लोकांकडून 'स्वतः जावं' याऐवजी 'स्वताने जावं' असे रूप कधी ऐकू येते, पण ते स्थिर होईल, असे वाटत नाही.

(२) पुं-स्त्री. २ गणातल्या 'आपण' सर्वनामाची तीन रूपे होतात : आपणा-, आपल्या-, आपसा-, यांपैकी आपसा- / आपापसा- ही रूपे परस्परता दाखवायची असली, तरच वापरतात. आपल्या-/ आपापल्याला यांमध्ये अर्थभेद संभवतो.

(३) सर्वनामाच्या चवथ्या रूपावर जिथे अनुस्वार नसतो, तिथे- ला याचा संधी होऊन- ना होण्याचा प्रश्नच नाही.

ह्याला / ह्यांला, ह्यांना

परंतु—

आम्हाला, तुम्हाला, आपणाला / आपल्याला, स्वतःला / स्वतःला, कुणा-कुणाला (इथे- ना येत नाही.)

(४) पुं- स्त्री- न. २ गणांमधल्या सर्वनामाच्या दुसऱ्या आणि चवथ्या रूपांबद्दल थोडा संदेह असू शकतो.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

तो– त्यात, त्यामध्ये, त्यावर किंवा
त्याच्यात, त्याच्यामध्ये, त्याच्यावर म्हणायचे ?
ती– तीत, तीमध्ये, तीवर किंवा
तिच्यात, तिच्यामध्ये, तिच्यावर म्हणायचे ?
ते– त्यात, त्यामध्ये, त्यावर किंवा
त्याच्यात, त्याच्यामध्ये, त्याच्यावर म्हणायचे ?

ही निवड काहीशी मूळ नावावर अवलंबून असते. मूळ नाम बैल, बाप, संपादक, मूर्ख, गाय, आई, गायिका, सीता, मूल, वासरू असे प्राणिवाचक असेल, तर दुसरे पर्याय अधिक पसंत केले जातात. उलटपक्षी, मूळनाम वाडा, शहाणपणा, घटना, गोष्ट, कुटुंब, घर, कपाट असे अ-प्राणिवाचक असले, तर सामान्यतः पहिले पर्याय अधिक पसंत केले जातात.

त्यानं तबेल्यातून घोडी काढली आणि तिच्यावर तो स्वार झाला.
त्यानं सायकल बाहेर काढली आणि तीवर / तिच्यावर तो स्वार झाला.
मूल आजारी पडलं, पण त्याच्यावर उपचार झाले नाहीत.
तिला दुखणं झालं, पण त्यावर/त्याच्यावर योग्य उपाय झाले नाहीत.

## विशेषणाचे विकार

विशेषणांचे विकारांच्या दृष्टीने दोनच गण पडतात. विकारांच्या दृष्टीने दोनच गण पडतात. विकारांच्या दृष्टीने विशेषणांचीही चार रूपे मानता येतात, मात्र तीनही लिंगांतून चालवून पाहावी लागतील.

वि– १ काळा, काळ्या, काळे, काळ्या
काळी, काळ्या, काळ्या, काळ्या
काळं, काळ्या, काळी, काळ्या

वि– ० लाल, लाल, लाल, लाल
लाल, लाल, लाल, लाल
लाल, लाल, लाल, लाल

विकारी विशेषणात काळा याप्रमाणे असा, सगळा, कोणता, पैसेवाला, अर्धा, शंभरावा आगलाव्या, पुढला, मुका, कडवा, इत्यादी विशेषणे मोडतात.

अविकारी विशेषणांत लाल याप्रमाणे गरम, सपाट, कडक, दुष्ट, मिथ्या, विरळा, पोर-खदा, बंगलीवजा, पोतंभर, छापील, आजारी, दीड, सवा, तिहेरी, इतर, सर्व, बहुतेक, पोटभरू, पुढील, मूक, कडू, इत्यादी विशेषणे मोडतात.

काही संदेहस्थळे : (१) काळं हे रूप काळे या रूपाची जागा आता लेखनातही घेताना दिसते. (घोडं, झाडं यांच्याबाबतीत असेच होताना आपण अगोदर पाहिले आहे.)

(२) काही विशेषणे विकल्पाने दोन्ही गणांत पडतात : पुढला / पुढील, मुका/मूक,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

कडवा/कडू ही उदाहरणे आपण पाहिलीच आहेत. काही विशेषणांच्या बाबतीत अर्थभेद संभवतो : गोडा ( मसाला, स्वभाव ) / गोड ( चहा, गळा ), दोन ( झाडं, कुत्री, मुलं ) / दोघं ( मुलं, जण ).

काही विशेषणांच्या बाबतीत विकारी पर्याय मागे पडतो आहे. तुलनेसाठी पाहा–

एका माणसाला, एका एका / एकेका माणसाला

एक माणसाला, एक एक / एकेक माणसाला

( ३ ) स्त्रीलिंगी एकवचनी नाम संबोधन म्हणून वापरले, तर त्याच्या विकारी विशेषणाला विकल्पाने दोन रूपे होतात.

वेड्या मुली / वेडे मुली

माझ्या प्रिये / माझे प्रिये

माझ्या आई / माझे आई

( ४ ) काही ठरीव वाक्प्रचार किंवा विशिष्ट भाषासरणी यात विकारी विशेषणाच्या याकारांत रूपाऐवजी त्याचे जुनावलेले एकारांत रूप दिसले, पण ते मागे पडत आहे.

कुणा एका काळी / कोणे एके काळी

त्यातल्या त्यात / त्यातले त्यात

वरच्या वर ( चेंडू झेलला ) / वरचे वर ( वीज जाते )

जायच्या वेळी / जायचे वेळी

आमच्या इथे / आमचे येथे

पण पहिला पर्याय बरा दिसतो. वीज सुद्धा वरच्यावर जायला हरकत नसावी !

( ५ ) विकारी विशेषण ज्या नामाच्या अगोदर, येते, त्या नामाप्रमाणे फिरते. पण ते नाम फिरताना दिसले नाही तर ? तरी विशेषण फिरते.

पांढऱ्या हत्तीवर

कालच्या रात्री

सगळ्या दिवसभर

पण काही ठिकाणी संदेह येतो.

बऱ्याच दिवसांपर्यंत / बरेच दिवसपर्यंत / बरेच दिवस ( ते काम चालले )

( ६ ) विकारी विशेषण त्या नामाच्या लगेच नंतर आले, तर ? तरी ते नामाप्रमाणे फिरते.

कावळे सगळे उडाले

कावळ्यांना सगळ्या सावज मिळालं.

नामाऐवजी सर्वनाम आले, तर थोडा फरक पडतो. पण तत्त्व तेच राहते.

त्यांना सगळ्यांना सावज मिळालं.

मला गरिबाला नाडू नका.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आम्हां गरिबांना नाडू नका.

पण असे विशेषण क्रियापदाच्या अगोदर आले, तर ? तरी ते फिरते, कर्म असले, तर कर्माप्रमाणे, क्रियापद अकर्मक असले, तर मात्र कर्त्याप्रमाणे.

त्याने काठी उभी धरली.

तो काठी उभी धरतो.

तू मला वेडी समजला होतास ? / वेडी समजतोस का ?

वैद्य रोगी बरा करतो / वैद्य रोग्याला बरा करतो.

काळे आहेत त्याचे हात. ( कर्त्याप्रमाणे )

मात्र क्रियापद न फिरणारे असेल, तर मात्र संदेह पडू शकतो.

बरंच उजाडलं. ( कर्ता, कर्म गैरहजर, संदेह नाही. )

थोडं खाल्लं, तर बरं. ( क्रियापद नपुंसकलिंगी एकवचनी तृतीयपुरुषी खरे, पण ते या लुप्त कर्माप्रमाणे फिरते आहे, संदेह नाही. )

वैद्याने रोगी बरा केला / वैद्याने रोग्याला बरं केलं / वैद्याने रोग्याला बरा केला. ( यांत पहिले दोन पर्याय योग्य दिसतात. तिसरा पर्याय म्हणजे पहिल्या दोन पर्यायांचा संकर म्हणून अयोग्य ठरतो. )

त्यानं मला वेडं समजावं का ? / वेडी समजावं का ?

मृत्यूने इथे ओशाळं व्हावं ! / ओशाळा व्हावं !

शेवटच्या दोन उदाहरणांत पहिला पर्याय बरा दिसतो– त्याच्या मागचे सूत्र हे 'बरंच उजाडलं' या उदाहरणामागेही आहे. ते म्हणजे क्रियापद अचल असले, तर त्याला जोडून येणारे विशेषणही अचल राहील.

## क्रियापदाचे विकार

नामे आणि विशेषणे यांच्याप्रमाणे क्रियापदाचे विकार थोडक्यात सुटसुटीतपणे मांडणे कठीण आहे. तेव्हा वाचकांनी मनाची थोडी तयारी करावी. ( पाहिजे तर मराठी शिकणाऱ्या परभाषकांची बिकट अवस्था जरा मनात आणावी, म्हणजे ही तयारी करायला बळ मिळेल ! )

मराठी क्रियापदांचे सात गण पडतात.

अकर्मक १ : यात ज्यांच्या शेवटी स्वर किंवा ह येतो, असे सर्व अकर्मक धातू येतात, उदाहरणार्थ– हो, जा, ये, भी, पोह, राह, वाह ( वारा )

अकर्मक २ : उरलेले सर्व अकर्मक धातू, उदाहरणार्थ– फिर, अस, आचव (जेवल्यावर ), पोच, पाव ( पैसे ), आचव ( संपत्तीला ), सुक, जळ ( तेल, मन ) बदल ( हवा ), रागाव, विसंब, पाव ( भक्ताला, नवसाला ), चुक ( गणित ), भेट, भांड, टेक, बिलग, डस, चाव ( कुत्रा ), चढ ( माडीवर ), उतर ( शिडीवरून ),



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

सोस (थंडी), पुर (पैसे), दिस, वाट, आवड, मिळ, सापड, हरव (हातून) समज (मला), आठव (मला), शोभ, लाग (हात, गरज, तहान), गमाव (मर), मार (पाऊस, वास), ढवळ (पोटात) उजाड, उकड, करम, फाव, अंधार, मळमळ.

सकर्मक १ : बोल, जप (आठवण), जप (माळ–उच्चार मात्र वेगळा), पाव (कृपा), खेळ (कबड्डी, हुकमाचे पान) समज, उमज, शिक (धडा), पढ (कल्मा), स्मर, विसर, चुक (काम) उतर (जिना, नदी), हर (पैज), प्रसव, पसव (लोंगर), ओक, हग, मुत, वद, लढ (लढाई, शत्रूशी).

सक. २ : जेव, पांघर, नेस, चाव (अन्न), जिंक (लढाई), आचर (व्रत), थुंक, शिंकर, शिंक, म्हण.

सक. ३ : एरवी सक. २ प्रमाणे, पण शेवटी स्वर किंवा ह येतो : गा, ले

सक. ४ : उरलेले सर्व सकर्मक धातू (मात्र शेवटी स्वर किंवा ह येत नाही) : कर, उचल, जमव, फिरव, सावर, बदल (कपडे), ढवळ (दूध), सोस (त्रास), गमाव, मोहव, इच्छ, अपेक्ष, चर्च (भस्म), दाखव.

सक. ५ : एरवी सक. ४ प्रमाणे, पण शेवटी स्वर किंवा ह येतो : दे, घे, ने, धू, पाह, साह, लिह, चाह, वाह (सामान, फुले).

जाणकारांना सावधगिरीची सूचना : सक. १ आणि पूर्वीचा 'उमज गण' सक २ आणि पूर्वीचा 'आचर गण' यांत साम्य आहे, पण ते एक नव्हेत, हे संबंधित याद्या पाहिल्यावर लक्षात येईल.

**काही संदेहस्थळे :** (१) रीतिभूत (तो कपडे उचली), जुना वर्तमान (देव जाणे, कळे न कळे, कसं का होईना), भविष्य (तो कपडे उचलील), पर्यंतच्या अगोदरचे रूप (कपडे उचलीपर्यंत) या ठिकाणी शेवटी उच्चारला जाणारा स्वर ई, की ए असावा ?

उत्तर : शेवटी स्वर किंवा ह येणाऱ्या सर्व धातूंमध्ये (म्हणजे गण अक. १, सक ३, सक ५) नक्कीच ई येतो. तिथे संदेह नाही.

परंपरेने गण सक. ४ मध्ये ई ग्राह्य, गण सक. २ मध्ये ए ग्राह्य, ई चालेल, गण अक. २, सक. १ मध्ये ए ग्राह्य.

प्रत्यक्ष वापरात अक. २ मध्ये ए आढळतो. गण सक. २ मध्ये ई पेक्षा ए जास्त ऐकू येतो. सक २, ४ मध्ये ए जास्त करून बायकांच्या आणि ई जास्त करून पुरुषांच्या तोंडी ऐकू येतो. एकंदर कल व्यवस्था सोपी करण्याकडे आहे, आणि ही समाधानाची बाब आहे. पुढे काय होईल, हे आताच सांगणे कठीण आहे. कयास असा आहे, शेवटी स्वर किंवा ह नसेल, तर सरसकट ए वापरायचा, असे रूढ होईल.

(२) ज्या ठिकाणी क्रियापदाला होणाऱ्या विकाराची सुरुवात व्यंजनाने होते, त्या ठिकाणी त्या व्यंजनापूर्वी इ किंवा ई येतो, की नाही ? उदाहरणार्थ, करीत आहे, तो करितो, तो



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

करिता तर !, तो काम करितांना, त्याने कपडे ठेविले, ठेविलेले कपडे, ठेविल्यावर, ठेविणे, ठेविणार. उत्तर : परंपरेने सांगायचे, तर ज्या धातूंच्या ठिकाणी भविष्य इत्यादी ठिकाणी ई येतो, तिथेच हा इ किंवा ई येतो, जिथे ए येतो, तिथे अ येतो.

प्रत्यक्ष प्रयोगात ज्या सक. ४ गणामधल्या धातूंमध्ये शेवटी जोडाक्षर येते, तिथे हा इ । ई टिकून आहे. उदाहरणार्थ, इच्छीत, अपेक्षितो, भस्म चर्चिले, उपेक्षिणे. त्याचप्रमाणे गण सक. ५ पैकी शेवटी ह येणारे धातू आणि गण अक. १ मधला राह धातू यांमध्ये ल च्या पूर्वी टिकून आहे. उदाहरणार्थ, राहिला, पाहिलेला, लिहिल्यावर. इतर सर्व ठिकाणी हा इ । ई नाहीसा झाला आहे. उदाहरणार्थ, पाहतो, करतो, वर्ततो, विसंबला, फुंकणे, पोहला,

बसविला, करवितो सारख्या सक. ४ गणातल्या पूर्वीच्या रूपांतूनच बशीवला, करीवतो ही रूपे उद्भवली होती. ती आता फारशी ऐकू येत नाहीत.

( ३ ) पळ, कळ, गळ, जळ, मिळ, उड, बुड, निव, रिघ, विझ, निम, म्हण या धातूंच्या शेवटी लच्या पूर्वी आ येतो का ? उदाहरणार्थ, पळाला, मिळालेला, उडाल्यावर, म्हणाला. उत्तर : आ विकल्पांने येतो. उदाहरणार्थ प्रस्तुत लेखकाच्या बोलण्यात कळ, गळ, जळ, विझ मध्ये आ येत नाही; पळ; मिळ, निघ, रिघ, निम, म्हणमध्ये आ येतो. उड बुड मध्ये आ येतो किंवा येत नाही. नव्या पिढीचा कल एकंदरीने आ गाळण्याकडे आहे. कल्पना काही वाईट नाही, भाषेतली एक अर्थभेदक नसलेली अनियमितता गेली, तर बरे.

( ४ ) क्रियापदाच्या रूपांचे निरनिराळे संच आहेत, हे एव्हाना आपल्या लक्षात आलेच असेल. उदाहरणार्थ, भविष्याचा संच ( मी झोपेन, आम्ही झोपू, तू झोपशील, इत्यादी ) या संचाचे पुन्हा पाच गट आहेत.

ल चा गट : तो झोपला, तो झोपलेला असे दोन संच

त चा गट : तो झोपतो, तो झोपता तर ! असे दोन संच.

ण चा गट : तो झोपणार, ती झोपणे—तिने झोपणे.

आव चा गट : तो झोपावा, त्याने झोपावं, तो झोपायचा असे तीन संच.

उरलेला गट : तो झोपे, ते झोपती ( झोपतात या अर्थी ), ते झोपतील, तो झोपो असे चार संच; आणि तो आहे, तो होता असे दोन विशेष संच. यांची चलने वेगवेगळ्या प्रकारची आहेत. संदेह नसलेले तीन गट आहेत.

त चा गट : लिंग, संख्यावचन, पुरुष यांप्रमाणे चलन राहते.

ण चा गट : झोपणार बदलत नाही, झोपणे कायम नपुंसकलिंगी, एकवचनी, तृतीयपुरुषी राहते.

उरलेला गट : संख्यावचन, पुरुष याप्रमाणे चलन राहते.

उरलेल्या दोन गटाच्या बाबतीत संदेहस्थळे आहेत.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

ल चा गट : झोपलेला लिंग, संख्यावचन, पुरुष यांप्रमाणे चलन, झोपला लिंग संख्यावचन याप्रमाणे चलन तर नक्कीच आहे. पण पुरुषाबद्दल संदेह वाटतो.

आवचा गट : झोपायचा लिंग, संख्यावचन, पुरुष याप्रमाणे चलन झोपावा लिंग संख्यावचन यांप्रमाणे चलन नक्कीच आहे, पण पुरुषाबद्दल संदेह.

आता आपण ज्यांच्याबद्दल संदेह आहे, तेवढेच संच बाजूला काढू.

| | |
|---|---|
| मी झोपलो– झोपले | आम्ही झोपलो |
| तू झोपला (स)– झोपली (स) | तुम्ही झोपला (त)- झोपले (त)– झोपल्या (त) |
| तो झोपला, ती झोपली, ते झोपलं | ते झोपले, त्या झोपल्या, ती झोपली |

गण अक. १, २, सक. १ या नमुन्यावर चालतात. मात्र काही मंडळी कंसातली अक्षर गाळतात.

| | |
|---|---|
| मी ठेवला, ठेवली इ. | आम्ही ठेवला, ठेवली इ. |
| तू ठेवला(स), ठेवली (स) इ. | तुम्ही ठेवला (त), ठेवली (त) इ. |
| त्यानं–तिनं–त्यानं ठेवला (न) ठेवली (न) इ. | त्यांनी ठेवला (नी), ठेवली (नी) इ. |

गण सक. ४, ५ या नमुन्यावर चालतात. मात्र काही मंडळी कंसातली अक्षरे गाळतात. सक. २, ३ विकल्पाने दोन्ही नमुन्यांवर चालतात, पण दुसरा नमुना अधिक प्रचारात येतो आहे.

तर मग कंसातल्या अक्षरांचे काय ?

उत्तर : कोकणातली चित्पावन मंडळी कंसातील सगळी अक्षरे ठेवतात. इतर मंडळी न, नी नेहमीच गाळतात, पण स, त बद्दल विकल्प आहे.

नव्या पिढीचा एकंदर कल व्यवस्था सोपी करण्याचा आहे. त्या पिढीतली मंडळी कंसातील सर्व अक्षरे तर गाळतातच, पण मी झोपले ऐवजी मी झोपली म्हणण्याकडे व तुम्ही झोपला या रूपाला फाटा देण्याकडे त्यांचा कल आहे. गण सक. २, ३ मधले धातू फक्त दुसऱ्या नमुन्यावर चालवण्याचा त्यांचा कल आहे.

म्हण हा धातू सक. २ गणामधला असल्यामुळे दोन्ही नमुन्यांवर तर चालतोच, पण शिवाय भानगड अशी आहे की दुसऱ्या नमुन्यावर तो चालतो तेव्हा म्हण। म्हणा ही रूपे न येता म्हट हे रूप वापरले जाते. नवी पिढी सामान्यतः हे सर्व पाळते. पण काही मंडळी फक्त पहिला नमुना घेतात आणि ' म्हण 'नंतर आ घालत नाहीत. जसे मी म्हणलो– म्हणले। म्हणली, तू म्हणला–म्हणली, इत्यादी.

आता आवच्या गटातील झोपावा या संचाकडे वळू.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| मी झोपावा–झोपावी | आम्ही झोपावे– झोपाव्या |
| तू झोपावा(स)– झोपावी(स) | तुम्ही झोपावे(त)–झोपाव्यात |
| तो झोपावा, ती झोपावी, - | ते झोपावे (त), त्या झोपाव्यात (त) - |
| ते झोपावं | ती झोपावी(त) |

| | |
|---|---|
| मी झोपावं | आम्ही झोपावं |
| तू झोपावं(स) | तुम्ही झोपावं(त) |
| त्याने–तिने–त्याने झोपावं | त्यांनी झोपावं |

गण अक. १,२ आणि हवा हे अनियमित अकर्मक क्रियापद ही या दोन्ही नमुन्यांवर चालतात. त्यांच्या अर्थांमध्ये थोडा फरक आहे.

| | |
|---|---|
| मी ठेवावा, ठेवावी इ. | आम्ही ठेवावा, ठेवावी इ. |
| तू ठेवावा(स), ठेवावी(स) इ. | तुम्ही ठेवावा(त), ठेवावी(त) इ. |
| त्याने-तिने त्याने ठेवावा ठेवावी. इ. | त्यांनी ठेवावा, ठेवावी इ. |

गण सक ४,५ या तिसऱ्या नमुन्यांवर चालतात. गण सक १, २, ३ कर्म उपस्थित नसले, तर अक १,२ प्रमाणे चालतात. पण कर्म उपस्थित किंवा लुप्त असले, तर सक ४, ५ प्रमाणे चालतात.

कंसातली स, त अक्षरे गळली, तर हे चलन केवळ लिंग, संख्यावचन यांच्याप्रमाणे राहील, पुरुषाप्रमाणे ते राहणार नाही, हे लक्षात यावे.

तर मग या कंसातल्या अक्षरांचे काय ?

उत्तर : कोकणातली चित्पावन मंडळी कंसातली सर्वच अक्षरे ठेवतात. इतर मंडळी ती सर्व विकल्पाने ठेवतात.

नव्या पिढीचा कल अपेक्षेनुसार कंसातली अक्षरे सरसकट गाळण्याकडे आहे. गण सक. २,३ मधले धातू फक्त दुसऱ्या व तिसऱ्या नमुन्यावर चालवण्याचा त्यांचा कल आहे.

लिंगाप्रमाणे फिरणाऱ्या संचांबद्दल एक गोष्ट लक्षात ठेवायची, म्हणजे करतं, करणं, केलं, करावं, हवं, होतं यांसारखी रूपे आता लेखनातही करते, करणे, केले इत्यादी रूपांची जागा घेताना दिसतात.

नाही, नव्हता, नव्हे ही नस धातूची रूपे अस धातूच्या आहे, होता या ‘ उरलेल्या ’ गटातील विशेष संचाप्रमाणे संख्यावचन, पुरुष यांना अनुसरून चालतात.

राहता राहिली ती पाहिजे, नको, नये ही विशेष अनियमित अकर्मक क्रियापदे. ( पाहिजे याचे पाहिजेल असेही एक रूप प्रमाण मराठीत येऊ पाहत आहे. )

| | |
|---|---|
| ( अमक्याला ) मी पाहिजे / नको ( आहे ) | आम्ही पाहिजे / नको ( आहो) |
| तू पाहिजे / नको ( आहेस ) | तुम्ही पाहिजे / नको ( आहात ) |
| तो–ती–ते पाहिजे / नको ( आहे ) | ते–त्या–ती पाहिजे / नको ( आहेत ) |



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

| | |
|---|---|
| मी नये | आम्ही नये |
| तू नयेस | तुम्ही नयेत |
| तो–ती–ते नये | ते–त्या–ती नयेत |

| | |
|---|---|
| मी पाहिजे / नको / नये | आम्ही पाहिजे / नको / नये |
| तू पाहिजे / नको / नये | तुम्ही पाहिजे / नको / नये |
| त्याने–तिने–त्याने पाहिजे / नको / नये | त्यांनी पाहिजे / नको / नये |

पहिल्या संचात ' आहे ' इत्यादी कंसांतली क्रियापदे हजर असली, तर ' पाहिजे ', ' नको ' अचल राहतात. पण कंसातली ' आहे ' इत्यादी क्रियापदे हजर नसली, तर पाहिजे । नको याला लुप्त झालेल्या आहे इत्यादी क्रियापदांची स, त ही अक्षरे परंपरेने लावली जातात. नव्या पिढीचा कल ती गाळण्याकडे आहे. ( उदाहरणार्थ, तू पाहिजेस ऐवजी तू पाहिजे. )

दुसऱ्या संचातल्या नये पुढच्या स, त अक्षरांची तशीच स्थिती आहे. नव्या पिढीतली मंडळी तर पुष्कळदा ' तो जाऊ नये ' ऐवजी ' तो जाऊ नाई ' म्हणून मोकळी होतात.

तिसऱ्या संचातली पाहिजे । नको । नये ही रूपे अचल राहतात. उदाहरणार्थ, त्याने जायला पाहिजे । नको, त्याने जाऊ नये. या ठिकाणीसुद्धा नवी पिढी पुष्कळदा ' नये ' ऐवजी ' नाई ' वापरून मोकळी होते.

आता आणखी एक अडचणीचा प्रश्न कुणी विचारील. तो म्हणजे धातूचा गण ओळखायला काही युक्ती आहे का ? काही ' तटस्थ लक्षणे ' आहेत का ?

उत्तर : अशी ' तटस्थ लक्षणे ' आहेत. पण– ( ' तटस्थ लक्षणं ' ही एक जुनी उपयुक्त पुनरुज्जीवन करण्यासारखी संज्ञा आहे. )

पहिली चाचणी. ' झोपणारं कोणतं– झोपलेलं कोणतं ? ' ' आवडणारं कोणतं– आवडलेलं कोणतं ? ' ' भांडणारं कोणतं–भांडलेलं कोणतं ? ' या दोन्ही प्रश्नांना एकच उत्तर असल्यास धातू अकर्मक. ' करमणारं कोणतं–करमलेलं कोणतं ? ' ' उजाडणारं कोणतं– उजाडलेलं कोणतं ? ' या प्रश्नांना उत्तरच नसल्यास धातू अकर्मक. ' खेळणारं कोणतं– खेळलेलं कोणतं ? ' ' ठेवणारं कोणतं-ठेवलेलं कोणतं ? ' या दोन प्रश्नांना दोन वेगवेगळी उत्तरे असल्यास धातू सकर्मक.

नंतर दुसरी चाचणी. सकर्मक धातू घेऊन ' खेळणारा खेळला ' असे म्हणता येते, पण ' खेळणाऱ्याने खेळलं ' असे म्हणता येत नाही. तर मग सक. १. ' जेवणारा जेवला, जेवणाऱ्याने जेवलं ' असे दोन्ही म्हणता येते. ' गाणारा गायला, ' ' गाणाऱ्यानं गायलं ' दोन्ही म्हणता येतं. तर मग सक. २,३. ' ठेवणारा ठेवला म्हणता येत नाही, पण ' ठेवणाऱ्याने ठेवलं ' म्हणता येते. तर मग सक. ४, ५.

( जाता जाता सांगायचे तर ' झोपणारा झोपला ' असे म्हणता येते. पण ' झोपणाऱ्यानं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

झोपलं' असे म्हणता येत नाही. हीच स्थिती आवड, भांड या धातूंची. 'करमणारा करमला, करमणाऱ्यानं करमलं' यांतले काहीच म्हणता येत नाही. हीच स्थिती उजाड या धातूची. पण हे सर्व अकर्मक धातू. त्यांना दुसरी चाचणी लावून बघण्याची सध्या गरज नाही.)

शेवटी तिसरी चाचणी. धातूच्या शेवटी स्वर किंवा ह आहे का ? मग अक. २ नव्हे तर अक. १; किंवा सक. २ नव्हे, तर सक. ३; किंवा सक. ४ नव्हे, तर सक. ५.

अशी ही संगणकाला आवडेल अशी सूचनावली. पण अवतरणचिन्हे असलेल्या वरच्या प्रश्नांची उत्तरे ना संगणक देणार, ना परभाषक देणार. ज्याला 'मराठी येते' तोच ती उत्तरे देऊ शकेल.

जर मराठीभाषकांकडूनच दोन वेगळी उत्तरं आली, तर त्या ठिकाणी विकल्प तरी आहे किंवा अर्थभेद तरी आहे, असे समजावे. ('विकल्प' म्हणजे 'ऑप्शन' बरं का !)

संगणक आणि परभाषक यांची सोय पाहायची, तर एक नव्या धर्तीचा धातुकोश सिद्ध करायला पाहिजे. मराठीभाषकाने असा कोश बनवला, तर त्याला तो बनवण्यासाठी अर्थातच ह्या चाचण्या उपयोगी पडतील.

(५) झोपणं, ठेवणं यांसारखी क्रियावाचक नामे न. १ गणामधल्या नामांसारखी चालतात. पण सामान्यतः बहुवचनी रूपे वापरण्याची वेळ येत नाही. (काचेची खेळणी, दुखणी, कुचकी बोलणी ही तर चक्क नामेच ठरतात.)

झोपणं, झोपण्या–, (झोपणी, झोपण्यां–) काही मंडळी झोपणेसाठी, ठेवणेवर, ठेवणेस यांसारखी जुनावलेली रूपे वापरतात. विशिष्ट भाषासरणीशी त्यांचे साहचर्य आहे. (कोणती भाषासरणी, ते ओळखा पाहू !)

झोपण्यासाठी, ठेवल्यावर, ठेवण्याला हेच पर्याय ठीक दिसतात.

मात्र 'या' ऐवजी 'ए' प्रत्यय हा झोपतेवेळी, जेवतेवेळी यांसारख्या रूपांत टिकून आहे, झोपत्यावेळी, जेवत्यावेळी अशी रूपे काही वापरात दिसत नाहीत.

(६) काही धातूंच्या शेवटी आव येतो. उदाहरणार्थ, रागाव, सुखाव, दुखाव, बजाव, बोलाव, डोकाव, कमाव, जोजाव, जुनाव, ठोठाव, धमकाव, जेव्हा आव गटातले विकार यांना होतात, तेव्हा उच्चार सुकर व्हावा, म्हणून धातूतल्या आव चा अव होतो. उदाहरणार्थ सुखवावा, सुखवायचा. कधी कधी या अवं उच्चाराची लागण इतर संचात होते. उदाहरणार्थ तो सुखावेल, सुखावतो ऐवजी कधी सुखवेल, सुखवतो ऐकू येते.

(७) झोपावयाला, झोपायाचे, झोपाचं या वळणाची रूपे आता जवळजवळ इतिहास-जमा झाली आहेत. झोपायला, झोपायचे ही रूपे स्थिर झाली आहेत.

(८) ज्या धातूंच्या शेवटी हे येतो (विशेषतः आह येतो) किंवा ज्या धातूंमध्ये शेवटून दुसरे अक्षर ह येते (टेहळ, ओहट), त्या सर्वांची स्थिती थोडी गुंतागुंतीची आहे. तिची विस्ताराने चर्चा मी इतरत्र केली आहे, ती जिज्ञासूंनी पहावी. वैखरी,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

पृ. २२९–३१ ) मात्र तो गुंता सोडवल्यावर बाब अगदी सोपी वाटावी, एवढेच इथे सुचवून ठेवतो.

(९) क्रियापदांची नास्तिपक्षी रूपे ही मराठीत मोठीच गुंतागुंतीची बाब आहे. कधी विकल्प नसतो. उदाहरणार्थ, तो न झोपो, त्याने / त्याचं न झोपणं. कधी विकल्प असतो. उदाहरणार्थ, ते न झोपती / ते झोपत नसती. कधी अर्थभेद असतो. उदाहरणार्थ, ते झोपतील याची नास्तिपक्षी रूपे ते न झोपतील / ते झोपत नसतील / ते झोपणार नाहीत / ते झोपणार नाही आहेत. यातून उद्भवणारी संदेहस्थळे दोन आहेत. एक म्हणजे आम्ही जाऊ का? आपण जाऊ- यांचा पारंपरिक नास्तिपक्ष : पहिल्याचा आम्ही न जाऊ का? / आम्ही जाऊ नको का? / आम्ही जायला नको का? तर दुसऱ्याचा आपण जायला नको. नवी पिढी पुष्कळदा म्हणते– आम्ही जाऊ या नको का? आपण जाऊ या नको. दुसरे संदेहस्थळ म्हणजे मला चहा पाहिजे (आहे), मला जायला पाहिजे (आहे), मी जायला पाहिजे (आहे). यांचा पारंपरिक नास्तिपक्ष : मला चहा नको (आहे), मला जायला नको (आहे), मी जायला नको (आहे). नवी पिढी पुष्कळदा म्हणते– मला चहा नको पाहिजे, मला जायला नको पाहिजे, मी जायला नको पाहिजे.

माझ्या कानाला ही दोन्ही ठिकाणची नवी रूपे नव्या पिढीच्या हस्ताक्षराइतकीच बेढब लागतात एवढे मात्र खरे. नको शब्दात नकाराबरोबर पाहिजे शब्दाचा अर्थ अगोदरच येऊन जातो. (तुलनेसाठी 'जाऊ नको' हे वाक्य पहावे.) मग 'नको पाहिजे' कशाला? त्यापेक्षा 'नाही पाहिजे? काय वाईट?

(१०) लेखन जेव्हा बोलभाषेच्या जवळ आणायचे असते, तेव्हा हटकून पिडणारी रूपे म्हणजे आहे, होता, नाही, नये आणि त्या त्या संचातली इतर रूपे. (अधिक तपशिलासाठी पहा : मराठीचे श्रवणप्रत्ययी लेखन, वैखरी, पृ. २३९–५४) विशेष चिन्हे न वापरता आणि थोडा ढोबळपणा पत्करून असे लेखन जमणे शक्य आहे. नमुन्यादाखल हा संवाद पहावा.

"तो कुठंय? इथं आलाय ना?"
"तो आत अए."
"तो आत नाहीए!" (किंवा- "तो आत नाइए!")
"आत्ता व्हता! मी बोललोवतो सुद्धा त्याच्याशी!"
"वरं ती त–आलीए?"
"माल्नाइठौक!"

## इतिकथन

मराठी नामविकार, विशेषणविकार, धातुविकार यांच्यामध्ये अपवादस्थळे (उदाहरणार्थ,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

म्हैस. जागा, चूक; चांदणी रात्र, अदमुरे दही, अबला स्त्री, निरसे दूध; जातो–गेला; भागला–मागितला आणि विकल्पस्थळे (उदाहरणार्थ, इंग्रजीमधून घेतलेल्या नामांची लिंगे आणि त्यांची बहुवचनी रूपे) पुष्कळच आहेत. पण इथे मुख्यतः संदेहस्थळांचाच विचार केला.

पत्रिकेच्या 'भाषाविवेक' सदरासाठी हे टिपण लिहिण्यासाठी श्रीयुत सुरेश भट, नागपुर (हो नागपुरच) आणि पुणे आकाशवाणीचे केंद्राधिकारी यांच्याकडून आलेल्या शंकापत्रामुळे प्रेरणा मिळाली हे कृतज्ञतापूर्वक नमूद करायला हवे.

ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४.

**तोंडी अक्षरओळख आणि 'र'चे राज्य**

"आई, फुर्र करतेस नं?" मुलीने मला विचारले. 'मी मिक्सर कधी चालू करणार?' असे तिला म्हणायचे होते. तिला 'मिक्सर' हा शब्द माहीत आहे. तरीही त्याच्या चालवण्याच्या क्रियेतील आवाजावरून 'फुर्र' हेच नाव तिने त्याच्यासाठी पसंत केले असावे.

या 'फुर्र'च्या वापरामागे आणखी एक कारण असे की, सध्या 'र' या अक्षराचा पाठपुरावा करण्यात ती गुंतलेली असते. तिला 'र'चा एकेरी उच्चार जमत नाही. 'र'चा साहजिकच 'ल' होतो. तो उच्चार चुकीचा आहे; हे आता कळते देखील! पण नुसता 'र' म्हणता तर येत नाही. यातून तिचा तिनेच मार्ग शोधून काढला आहे. तिला स्वतःलाच बोलता बोलता हे लक्षात आले आहे की, तिला 'र'चा अर्धा उच्चार (जोडाक्षरातील 'र') येतो आणि द्वित्त 'र' ('र'चा जोर देऊन 'र्र' असा उच्चार) ही येतो. या दोन्ही प्रकारे 'र'चा उच्चार जमला की 'र' सापडल्याच्या आनंदात ती रंगून जाते. त्यामुळे 'कुर्डयी' हा पदार्थ तिला हल्ली त्या उच्चारामुळेच आवडू लागला असावा! 'पांढरा'चे 'पांढ्रा' आणि 'हिरवा'चे 'हिर्वा' करून ती आपल्यापरीने 'र'ला उच्चारात पकडू पाहत असते. तिच्या या खेळाला चालना देण्यासाठी मी तिच्यासाठी एक गाणे रचले आहे. ते असे :

"राक्षस होता अललडुर्र
झोपला होता ढाराढूर
त्याच्या कानात केले कुर्र
तो ओरडला गुर्र गुर्र"

हे गाणे ती वेळीअवेळी म्हणत असते आणि हल्ली घरात 'र'चे राज्य चालू असल्याचे एकप्रकारे घोषित करीत असते.

नीलिमा गुंडी, ६/७० लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११०३०.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

# अर्थो हि अर्थः परकीय एव !

माधव ना. आचार्य

मराठीचे पारंपरिक व्याकरण अभ्यासताना अनेक समस्या लक्षात घ्याव्या लागतात. अशा समस्यांच्या अस्तित्वाची कारणमीमांसा करताना प्रमाणविचारातील काही प्रमादांचा निर्देश केला जातो. ह्या प्रमादांमध्ये 'अर्थ' प्रमुख आहे. 'व्याकरण म्हणजे पदशास्त्र किंवा रूपविमर्शात्मक शास्त्र; तेथे अर्थविमर्श आणणे, म्हणजे ते शास्त्र चुकीच्या रुळांवरून नेण्यासारखे आहे.'— असे एक विधान या संदर्भात नेहमी केले जाते. या विधानाचा नेमका अर्थ व त्याच्या मर्यादा पारंपरिक व्याकरणातील समस्यांच्या संदर्भात व तद्विषयक चर्चेतून निष्पन्न झालेल्या व्यवस्थासूत्रांच्या आधारे लक्षात घेणे, एवढाच या टिपणाचा सीमित उद्देश आहे.

केवळ विवेचनाच्या सोयीसाठी या समस्यांचे पुढीलप्रमाणे चार मुख्य विभाग करू— (अ) व्याकरणाची कक्षा (ब) शब्दवर्ग (क) विकरणव्यवस्था (ड) अन्वयसूत्रे.

## (अ) व्याकरणाची कक्षा

व्याकरण म्हणजे भाषेचा अभ्यास. परंतु हा अभ्यास अनेक अंगांनी होऊ शकतो. त्यामुळे व्याकरणशास्त्र हे कोणत्या अंगाने भाषेचा अभ्यास करते, हे निश्चित करून तद्नुसार त्याची संदर्भसूत्रे ठरवावी लागतात. ही ठरविताना (अ १) वर्णविचार व (अ २) वाक्यपृथक्करण यांच्या संदर्भात काही प्रश्न निर्माण होतात. कोणते, ते क्रमाने पाहू या.

(अ १) वर्णविचार— कोणत्याही व्याकरणाची सुरुवात वर्णमीमांसेपासून केली जाते. परंतु कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात, 'व्याकरणाचे मुख्य भाग दोन—शब्दविचार व वाक्यविचार. कोणी कोणी वर्णविचारास तिसरा भाग कल्पून या शास्त्राचे तीन विभाग करतात. परंतु बारीक दृष्टीने पाहता सार्थकसमुदायरूप जी भाषा, तिचे प्रधान विभाग दोनच होत— शब्द आणि वाक्ये; वर्णांस स्वतंत्र अर्थ नसल्यामुळे त्यांचा विचार शब्दविचाराच्या पोटात येतो.' (चिप. १९)

चिपळूणकरांचे हे म्हणणे नंतर अर्जुनवाडकरांनी वेगळ्या पद्धतीने मांडले आहे. ते लिहितात, 'अर्थनिरपेक्ष असलेला ध्वनिविचार व्याकरणाच्या कक्षेत येत नाही.' (अर्जु. ८०)

हा विचार लक्षात घेतला, की भाषेच्या अभ्यासाचे 'ध्वनिविचार' हे जे अंग आहे, त्यापासून व्याकरणाचे कार्यक्षेत्र वेगळे करता येते. ध्वनिविचारात भाषेचे मूलध्वनी विचारात घेतले जातात. तो भाषाविज्ञानाचा पाया. म्हणूनच तेथे स्वनिमविचार येतो. स्वनिमाची अर्थविभेदकता व अविभाज्यता लक्षात घेऊन स्वर व व्यंजने निश्चित केली जातात.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

व्याकरणाची दृष्टी थोडी वेगळी. तेथे शब्दाचे घटक म्हणून वर्ण लक्षात घ्यावयाचे. येथील स्वर, व्यंजन हे वर्गीकरण, त्याचप्रमाणे स्वरांचे ऱ्हस्व, दीर्घ, संयुक्त हे भेद केवळ कार्यकारी स्वरूपाचे आहेत. हे कार्य कोणते ? तर, शब्दाचा अर्थ निश्चित करणे व संधी होताना घडणाऱ्या वर्णविकृती सांगणे. म्हणूनच काही वैयाकरण जरी, 'मराठीत ऱ्हस्व-दीर्घत्व हे अर्थविभेदक नाही.', असे सांगत असले (मंग. ६०), तरी ते दुर्निरीक्षण म्हणून मान्य करता येत नाही. रिती–रीती, शिव–शीव, सुत–सूत, पुर–पूर अशा ठिकाणचा ऱ्हस्वदीर्घभेद अर्थनिश्चितीला उपयोगी पडणारा आहे.

त्याचप्रमाणे स्वनिमविचाराच्या दृष्टीने ऐ– औ हे स्वर विभाज्यतेच्या मुद्द्यावर नाकारले जात असले, तरी व्याकरणात वर्णविकृती सांगताना (जसे–वृद्धी) ते उपयोगी पडत असल्यामुळे त्यांचे अस्तित्व मान्य करावे लागते. (अर्जु. ८२)

थोडक्यात ध्वनिविचारातील मूलध्वनी ही कल्पना व्याकरणात उपयोगी पडणारी नाही. ध्वनिविचारापासून व्याकरणाचे क्षेत्र अलग करताना 'अर्थ' उपयोगी पडतो, तो असा व या मर्यादेने.

(अ २) वाक्यपृथक्करण– उद्देश्यविधेयात्मक वाक्यपृथक्करण हा विषय मुळात इंग्रजी व्याकरणाच्या पाठ्यपुस्तकातील. तेथून तो मराठी व्याकरणात आला.

हा विषय मूळचा तर्कशास्त्रातील. थोडी तडजोड करूनच तो व्याकरणात घेऊ शकतो, हे दामल्यांनी नोंदलेच आहे. (दाम. ७१२)

येथे निर्णय घेताना व्याकरणिक वाक्यार्थ व तार्किक वाक्यार्थ यांतील भेद लक्षात घ्यावा लागतो. वाक्याचे घटक– उद्देश्य, विधेय व संयोजक यांची प्रमाणसिद्ध संगती पाहणे हे काम तर्कशास्त्राचे. त्या दृष्टीनेच मीमांसकांच्या वाक्यविचारात वाक्यघटकांचा 'योग्यता' हा गुण महत्त्वाचा आहे. 'योग्यता' म्हणजे 'पदांचा अर्थ अन्य प्रमाणांनी बाधित न होणे.' उदा. 'वन्हिना सिञ्चति' हे वाक्य त्यांच्या दृष्टीने केवळ 'वाक्यब्रुव' आहे. कारण अग्नी ही काही शिंपडण्याजोगी वस्तू नव्हे, हे अनुभवसिद्ध आहे.

वैयाकरणाला असे वाक्य चालते. कारण तो वाक्यविचारात क्रियापद व त्याशी कारक-संबंधाने अन्वय पावणाऱ्या पदांना केवळ महत्त्व देतो. हा अन्वय ज्या प्रत्ययांमार्फत दाखविला जातो, ते भाषेत रूढ असले की, ते वाक्य त्याच्या दृष्टीने ग्राह्य. म्हणूनच, 'भट्टस्य कर्ण्यां सरटः प्रविष्टः।' हे मीमांसकांना अप्रमाण असणारे वाक्य व्याकरणाला चालते, असे थोडे अतिरेकी विधान केले जाते. अतिरेकी म्हणण्याचे कारण इतकेच की, वैयाकरण हा काही तर्कदुष्ट विधाने करीत नसतो; परंतु तो वाक्यघटकांच्या अर्थाची चिकित्सा करीत नाही, एवढेच यातून सुचवायचे आहे. वाक्यघटकांना अर्थ आहे, एवढी गोष्ट वैयाकरणाला पुरेशी आहे.

उद्देश्यविधेयात्मक वाक्यपृथक्करण हे वाक्यघटकांच्या अर्थसंगतीवर निर्भर आहे. व्याकरणाला आपल्या पदान्वय मांडणीच्या कार्यात त्याचा उपयोग होत नाही. व्याकरणिक



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

वाक्यपृथक्करण हवे असेल, तर ते कर्ता व क्रियापद आणि असल्यास कर्म यांच्या पद-संबंधाधारे सांगता येईल. वाक्याचे हे दोन/तीन मुख्य भाग सांगून त्यांची विशेषणे नमूद करता येतील. असा एक साचा 'मराठी घटना, रचना, परंपरा'मध्ये मंगरूळकर–अर्जुन-वाडकरांनी सुचविला आहे. (मंग/अर्जु १३८ पदटीप) पारंपरिक मराठी व्याकरणात तो अजून कुणी अनुसरलेला दिसत नाही.

तेव्हा, 'व्याकरण हे अर्थविमर्शात्मक शास्त्र नव्हे', या विधानाचा अभिप्राय या उपविभागात स्पष्ट होतो.

## (ब) शब्दवर्ग

शब्दजातींची माहिती हा व्याकरणाचा एक प्रमुख भाग. शब्दांना जे विकार होतात, त्यांच्या अपेक्षेने सव्यय व अव्यय असे दोन ठळक जातिभेद सांगितले जातात. त्यानंतर प्रमुख जाती सांगून त्यांचेही उपवर्ग सांगण्याची पद्धत आहे. या पारंपरिक आराखड्याचा विचार करताना 'अर्थ' या संकल्पनेच्या संदर्भात निर्माण होणारे प्रश्न पुढील विषयांशी संबद्ध आहेत– (ब-१) शब्दवर्गाचे निकष (ब २) काही उपवर्गांचा विचार.

त्यांचा आता क्रमाने विचार करू.

(ब १) **शब्दवर्गाचे निकष :** मराठी व्याकरणात शब्दांच्या आठ जाती आल्या, त्या इंग्रजी व्याकरणाच्या अनुकरणाने, ही गोष्ट सर्वपरिचित आहे. या आठ जातींमागील तत्त्व कोणते ? तर शब्दाचे वाक्यामधील कार्य. नाम, सर्वनाम, क्रियापद, क्रियाविशेषण– या सर्व कार्यसंज्ञा आहेत. भाषा ही विचार व्यक्त करण्यासाठी आहे; तेव्हा तीमधील वाक्य व त्याचे घटक जे शब्द यांचे प्रमुख कार्य, विचार नीट व्यक्त करणे हे आहे– अशी भूमिका या वर्गीकरणामागे आहे. ही भूमिका आपण 'वाक्यमीमांसा'कार आगरकरांच्या विवेचनाधारे मांडून पाहू. त्यांनी विश्लेषणासाठी घेतलेले वाक्य असे– 'काळा घोडा पुलावर भरधाव पळाला, पण तो धरला.' (आग. २१४)

यातील प्रत्येक शब्दाचे स्पष्टीकरण त्यांनी विचार व्यक्त करण्याच्या त्या त्या शब्दाच्या वाक्यातील कार्याधारे केले आहे. जसे - मला 'घोडा' या प्राण्याविषयी बोलावयाचे आहे, म्हणून प्रथम वस्तूचे नाव ते 'नाम'. त्या प्राण्याने कोणती क्रिया केली ती सांगणारा शब्द (पळाला) ते क्रियापद. घोड्याचा रंग म्हणजे गुण दाखविणारा 'काळा' हा शब्द ते विशेषण. पळण्याच्या रीतीचे वर्णन करणारा शब्द 'भरधाव'– हे क्रियाविशेषण... या प्रकारे त्यांनी सर्व शब्दांचे स्पष्टीकरण दिले आहे. (आग २११ ते २१४) स्पष्टीकरणा-मागे त्यांचे वाक्यलक्षण उभे आहे; ते असे- 'ज्याच्या योगाने आपल्या मनातील कोणताही विचार मनुष्यास पूर्णपणे कळवून देता येतो, अशा शब्दसमूहास वाक्य असे म्हणतात.' (आग २११)

ही संपूर्ण भूमिकाच अर्थनिष्ठ आहे. 'व्याकरण हे तर्काचे पुच्छ' अशी एक समजूत



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

आहेच. पण व्याकरणाला ती मान्य नाही. व्याकरण हे पदशास्त्र. तेव्हा वाक्यातील घटक-शब्दांचा विचार त्यांच्या कार्यावरून न करता त्यांना लागणाऱ्या प्रत्ययांवरून करावा, अशी व्याकरणाची भूमिका आहे. म्हणून येथे 'रूप' हा निकष व्याकरण प्रामुख्याने मानते. यालाच अनुसरून चिपळूणकरांनी प्रातिपदिक, सव्यय व अव्यय या शब्दांच्या तीन मुख्य जाती मानल्या आहेत. (चिप. २८). प्रत्ययांच्या वर्गीकरणाधारे ह्या वर्गांना अनुक्रमे–विभक्तिप्रत्ययापेक्षी, आख्यानप्रत्ययापेक्षी व प्रत्ययानपेक्षी (प्रत्यय + अनपेक्षी) असे म्हणता येईल.

व्याकरण प्रत्ययांना महत्त्व का देते? कारण प्रत्यय हा भाषेचा चिरस्थायी भाग आहे. प्रकृतिशब्द जरी अन्य भाषांतून आले असले तरी ते मराठीच ठरतात कारण त्यांना ही प्रत्ययव्यवस्था लागू पडते. हे प्रत्यय ठरीव असतात. ते पुनःपुन्हा येतात. त्यांची गणना करता येते. त्यामुळे व्याकरणातील संकल्पना या प्रत्ययाधारे स्पष्ट करणे हा मार्ग शास्त्र-दृष्ट्या निर्दोष आहे. (अर्जु. १५१)

या दृष्टीने प्रथम प्रत्ययांच्या याद्या तयार करून त्यांचे गट पाडावे लागतात. या गटात सवचन अपुरुष प्रत्यय लागणारा तो विभक्तिप्रत्ययापेक्षी नामिक गट, सवचन सपुरुष प्रत्यययोगी तो आख्यातप्रत्ययापेक्षी धातुगट व उरलेली ती प्रत्ययानपेक्षी अव्यये, असे म्हणता येईल.

येथे एक शंका उपस्थित केली जाते. दोन्ही गटांत जेव्हा समानप्रत्यय मिळतात, तेव्हा शब्दवर्ग कसे करतात? उदा. 'ला' प्रत्यय विभक्तीचा आहे, तसाच आख्याताचाही. 'देवाला' व 'गेला' अशी रूपे आल्यानंतर भेद करताना कोणता निकष वापरतात? याचे उत्तर वरील विवेचनात आलेच आहे. या दोन गटांत 'पुरुष' हे भेदतत्त्व आहे. त्यामुळेच 'देवाला'मधील 'ला' हा प्रत्यय ज्यांना 'ने, चा, त' असे प्रत्यय लागतात, त्याच शब्दांना लागताना मिळेल; 'ता, वा, उ, ईल' असे प्रत्यय लागणाऱ्यांना तो कधीच लागणार नाही. याच्या उलट प्रकार 'गेला'मधील 'ला'चा आहे. कारण हे गट शब्दांच्या जन्मजात धर्मांवर आधारलेले आहेत.

असाच प्रकार तद्धित 'ला' (येथला, तेथला) व विभक्तिप्रत्यय 'ला' यांच्या बाबतीतही आहे. तद्धित 'ला' हा अवचन गट प्रत्यय आहे; शिवाय तो शब्दसिद्धिकारक प्रत्यय असल्यामुळे चरमेतर आहे. उलट विभक्ति 'ला' हा सवचन गट प्रत्यय असून पदसिद्धिकारक असल्यामुळे चरम प्रत्यय आहे.

वर ज्या जन्मजात धर्मांचा उल्लेख केला, ते कसे ठरले? त्यामागे अर्थातच भाषेचा रूढ अर्थसंकेत आहे. म्हणजे येथे 'अर्थ' आलाच. होय; परंतु त्याला दुय्यम/साहाय्यकारी स्थान आहे. व्याकरणाच्या दृष्टीने रूप प्रधान; अर्थ गौण; रूप हे प्राणप्रद तत्त्व, तर अर्थ हा विशेषाधान हेतू. कारण व्याकरण हे पदशास्त्र.

पण व्याकरण हे पदान्वयाचाही विचार करते. त्या संदर्भातही रूढ शब्दजातींपैकी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

काहींचा विचार करताना ' अर्था 'चे स्वरुप लक्षात घ्यावे लागते. तो उद्योग ' अन्वयसूत्रे ' या विभागात करू.

(ब २) काही उपवर्गांचा विचार– रूपाधिष्ठित वर्गीकरण स्वीकारले, तरी रूढ शब्द-वर्गांच्या सर्वच समस्या संपत नाहीत. या विभागात अशा काहींच्या संदर्भातील ' अर्था 'ची कक्षा आता समजावून घेण्याचा प्रयत्न करू. त्यासाठी या विभागाचे दोन उपविभाग करू. (ब २.१) नामादींचे उपप्रकार व (ब २.२) संयुक्त क्रियापदांचा प्रश्न.

(ब २.१) नामादींचे उपप्रकार : बहुतेक शब्दवर्गांचे उपप्रकार सांगणे ही पारंपरिक व्याकरणाची एक खास रूढी आहे. वर्गीकरण हा जरी शास्त्राचा पाया असला, तरी ते प्रत्येक शास्त्राच्या संदर्भसूत्रांप्रमाणेच झाले पाहिजे. तसे झाले नाही तर केवळ वर्गीकरणा-साठी वर्गीकरण असा प्रकार होतो. पारंपरिक व्याकरणातील नामादींचे उपप्रकार थोडेबहुत याच मासल्याचे आहेत. कसे ते नामांच्या रूढ उपप्रकारांच्या आधारे नोंदू.

सामान्यनाम, विशेषनाम व भाववाचक नाम असे नामाचे तीन उपप्रकार सांगितले जातात. दामल्यांनी यांपैकी पहिल्या दोघांना धर्मिवाचक, तर भाववाचकांना धर्मवाचक म्हटले आहे. यामागे त्यांची दृष्टी न्यायशास्त्राची आहे.

मुळात नामाची व्याख्या करतानाही त्यांनी याच भूमिकेचा अवलंब केला आहे. ' नाम म्हणजे नाव ' हे जुने लक्षण ते अशास्त्रीय मानतात. ' वस्तुवाचक विकारी शब्द ' हे त्यांच्या मते नामाचे शास्त्रग्राह्य लक्षण. (दाम ७७)

पण दामले एवढ्यावरच थांबत नाहीत. ' वस्तू ' या संकल्पनेची अधिक चिकित्सा करून धर्म-धर्मी असा भेद ते करतात. धर्माला स्वतंत्र अस्तित्व नाही. तो धर्मीच्या आधारे राहतो. म्हणून हे उपवर्ग दामल्यांना आवश्यक वाटतात.

खरे म्हणजे, ही सारीच चिकित्सा व्याकरणाला उपयोगी पडणारी आहे, असे म्हणता येत नाही. कारण यामागे जी तत्त्वशोधकाची भूमिका आहे, ती जर ताणली, तर भाषेतील प्रत्येक शब्दच वस्तुवाचक ठरेल व व्याकरणात नामाव्यतिरिक्त काही शिल्लकच राहणार नाही. म्हणूनच अर्थाची चर्चा करीत बसणे हे व्याकरणाच्या कक्षेबाहेरचे मानले जाते. व्याकरणाच्या दृष्टीने, ज्याला विभक्तिप्रत्यय लागतात, ते नाम, एवढे वर्णन पुरेसे आहे. धर्मवाचक असो वा धर्मिवाचक, त्याला होणारे विभक्तिकार्य समानच आहे. म्हणूनच, ह्या कंठाळी स्वरूपाच्या वर्गीकरणाचा व्याकरणाला काही लाभ नाही, असे म्हटले जाते. (मंग. १०२)

या संदर्भात गुंजीकरांनी घालून दिलेली शास्त्रमर्यादा उल्लेखनीय आहे. ते म्हणतात, ' कोणत्याही शास्त्रीय ग्रंथामध्ये एखाद्या विषयाचे जेव्हा विभाग करावयाचे असतात, तेव्हा त्या विभागांचा उपयोग काय, हे लक्षात आल्यावाचून कधीही ते विभाग करू नयेत. ' (गुंजी. २२५).

अन्य शब्दजातींच्या रूढ उपवर्गांनासुद्धा याच भूमिकेतून व्याकरणातून बाजूला काढले



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

पाहिजे. कारण त्यातील बहुतेक उपवर्ग हे त्या त्या शब्दांचे केवळ कोशगत अर्थ आहेत.

जाता जाता धातूंच्या वर्गीकरणाचा उल्लेख करायला हवा. धातू ही आख्यातप्रत्ययापेक्षा शब्दजाती. तिच्या वर्गीकरणात अर्थ व व्युत्पत्ती असे दोन आधार घेतले जातात. अर्थनिष्ठ वर्गीकरण हे कर्ता व कर्म या संकल्पनांवर आधारलेले आहे; तर व्युत्पत्तिनिष्ठ हे शब्द-साधनेवर आधारित आहे.

' अर्थनिष्ठ 'मधील ' अर्थ ' या संकल्पनेचा अर्थ कारकसंबंध असा आहे. म्हणजेच हे एक अन्वयसूत्र आहे. तेव्हा त्याचा विचार त्या विभागात करणे युक्त आहे.

(ब २.२) संयुक्त क्रियापदे : पारंपरिक व्याकरणात संयुक्त क्रियापदांच्या चर्चेने बरीच जागा अडविली आहे. यामध्ये संयुक्त क्रियापदे मानणारे–न मानणारे असे आहेत. त्यांच्या तपशिलात न जाता ती मानणाऱ्यांच्या ' अर्थ ' समर्थनाची फक्त नोंद करू. या समर्थकांनी ' अर्थ ' हा शब्द कोणकोणत्या अभिप्रायांनी वापरला आहे पहा :

१. ' त्याने सारी पुस्तके देऊन टाकली ' यातील ' दे ' व ' टाक ' या धातूंचे सुटे अर्थ वेगळे; संयुक्त अर्थ वेगळा. (जोशी कलम ४६९ )

२. ' To love '=' प्रेम करणे ' येथे ' love ' या एकाच शब्दात जो अर्थ आहे, तो ' प्रेम करणे ' या दोन शब्दांत आहे. म्हणून ते संयुक्त क्रियापद. ( खेर ८७ उद्धृत दाम. ६०५ )

३. संयुक्त क्रियापदामध्ये आख्यानरूपी धातू हा सहाय गौण धातू; कृदंतरूपी धातू हा अर्थदृष्ट्या मुख्य. ' त्याने हे पुस्तक लिहून काढले. ' येथे ' लिहून ' हे कृदंत अर्थदृष्ट्या मुख्य असलेल्या धातूचे. ' काढले ' हे आख्यानरूप गौण धातूचे. अर्थाच्या या गौणप्रधानभावा-मुळे संयुक्त क्रियापद मानावे लागते. (दाम ६०० )

४. ज्याप्रमाणे नामे, विशेषणे व क्रियाविशेषणे इत्यादींचे अर्थ कधी कधी एकाच शब्दाने स्पष्ट होत नसल्यास दोन किंवा अधिक शब्दांचा उपयोग करावा लागतो, त्याप्रमाणे क्रियापदाचा अर्थही मिश्र व संयुक्त असल्यास एकाहून अधिक शब्द योजण्याची मोकळीक का नसावी ? ( आग. २४१ )

...या सर्व समर्थनांमध्ये धातूच्या अर्थावर ( मुख्य, लाक्षणिक, संयुक्त ) भर आहे. पण व्याकरणदृष्ट्या अर्थच्छटांची ही चर्चा निरुपयोगी आहे. कारण व्याकरण हे पदशास्त्र. तथाकथित संयुक्त क्रियापदातील कृदंतरूप धातू व आख्यानरूप धातू ही दोन्ही पदे स्वतंत्र-पणे व्याकरता येतात. आख्यानरूपी धातू ते क्रियापद. कृदंतरुपी धातूचे वेगळे व्याकरण सांगता येते. कृदंत हे पददृष्ट्या सव्यय वा अव्यय असेल; पदान्वयदृष्ट्या ते कर्ता, कर्म वा विशेषण असेल. एवढ्या स्पष्टीकरणावर व्याकरणाचे कार्य संपते. (अधिक विवेचन—विवेक ८९ )

## ( क ) विकरण व्यवस्था



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

विकरण-व्यवस्थेत विभक्ती व आख्यात यांमध्ये ' अर्था 'चा मुद्दा येतो. यांपैकी विभक्तीं-मध्ये, विभक्त्यन्त शब्दांचा अन्य शब्दांशी येणारा संबंध, या अर्थाने हा मुद्दा येतो; तर आख्यातामध्ये कालार्थविचार येतो. यांचा तपशील सर्वज्ञात आहे.

येथे व्याकरणाची भूमिका कोणती ? व्याकरणात पदविचार महत्त्वाचा. ते कसे बनते ? तर मूळ प्रकृतिशब्दाला प्रत्यय लावल्यामुळे. अशी पदे जेव्हा वाक्यात एकत्र येतात, तेव्हा आपण त्यांचे कर्ता, कर्म इ. संबंध सांगतो. परंतु हा भाग नंतरचा. मुळात पदाचा विचार करताना प्रत्ययांवरच लक्ष केंद्रित करून त्यांचे वर्ग पाडले पाहिजेत. ते वर्ग पाडण्यासाठी कर्ता, कर्म इ संबंध लक्षात घेण्याची गरज नाही. ( दाम. २७८ )

कारण रूप म्हणजे विभक्ती; नाते म्हणजे कारक. अगोदर रूपविकारात विभक्ती सांगून नंतर संबंधकथनात कारक सांगणे योग्य. ( मोड २३१-२३२ )

व्याकरणसंज्ञा ह्या रूपतंत्र असतात. ( मोड. २४० )

म्हणजे येथे रूप व अर्थ यांमध्ये एक क्रम आहे; व तदनुसार रूपाचे सापेक्ष महत्त्व अधिक आहे.

आख्यातांच्या बाबतीतही असाच क्रम आहे. कालार्थद्योतक संज्ञा- ( वर्तमान, आज्ञार्थ इ. ) या अर्थानुसारी आहेत. येथेही विभक्तींप्रमाणेच एकच आख्यातप्रत्यय अनेक अर्थच्छटा व्यक्त करतो. त्यामुळे त्यांची चिकित्सा व तदनुसारी वर्गीकरण-नामकरण हे व्याकरणाच्या भूमिकेत बसत नाही. म्हणूनच दामल्यांनी ता-ख्यात, वाख्यात, इ. ' अर्थहीन खुणावजा नावे ' दिली. ( दाम. ३५७ )

तेव्हा विकरण-व्यवस्थेत रूपनिष्ठ भूमिकाच महत्त्वाची ठरते.

## ( ड ) अन्वयसूत्रे

येथवरच्या चर्चेत पदाच्या संदर्भात प्रामुख्याने विचार झाला. आता पदान्वयाच्या संदर्भात ' अर्थ ' कुठे, कसा येतो ते पाहू. पूर्वविभागात एकदोन प्रश्नांचा उल्लेख करताना या विभागाचा हवाला दिला आहेच. त्यासह या विभागाचे तीन उपविभाग करू : ( ड १ ) विशेष्य-विशेषण-भाव ( ड २ ) कर्ता व कर्म ( ड ३ ) प्रयोग.

( ड १ ) विशेष्य विशेषण भाव : ( ब १ ) विभागात हवाला दिल्याप्रमाणे येथे रूढ शब्दजातींपैकी विशेषण व क्रियाविशेषण यांचा विचार करावयाचा आहे. रूढ व्याकरण-लक्षणात विशेषणाला, ' नामाविषयी अधिक माहिती सांगणारा शब्द ', तर क्रियाविशेषणाला, ' क्रियापदाविषयी अधिक माहिती सांगणारा शब्द '- असे म्हटले जाते. या ' अधिक माहिती 'ला थोडे शास्त्रीय रूप देताना ' व्याप्ती मर्यादित करणारा शब्द ' असे म्हटले जाते. ( दाम. ११४ )

व्याप्ती ही न्यायशास्त्रीय कल्पना आहे. व्याकरणात ती घेताना तदनुसारी परिमित



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

करून घेतली पाहिजे. न्यायशास्त्रामध्ये, 'व्याप्त व व्यापक यांचा नित्यसंबंध' म्हणजे 'व्याप्ती' (दीक्षि १३४)

व्याकरणाच्या दृष्टीने, 'विशेष्य-विशेषणाचा संबंध वा अन्वय', एवढाच व्याप्तीचा अर्थ घ्यायला हवा. हा संबंध वाक्यातील अनेक शब्दांमध्ये असतो. प्रयोग सांगताना कर्ता, कर्म व क्रियापद यांचा अन्वय वा अनन्वय सांगितला जातो. तेथेही हेच तत्त्व आहे. मंगरूळकर लिहितात, 'ज्यांना आपण क्रियापदे म्हणतो, ती सर्व विशेषणे आहेत. कारण त्यांना यथासंभव लिंगवचनादी विकार होतात.' (मंग. ९४)

प्रयोगाप्रमाणेच विशेष्य-विशेषण भावाचे हे तत्त्व रूढ शब्दजातींपैकी नाम–नाम, नाम–सर्वनाम, नाम–विशेषण अशा सर्व पदसंबंधांमध्ये आढळून येते. या तत्त्वामुळे पदांचा रूपनिष्ठ संबंध सांगता येतो. जेव्हा एक पद दुसऱ्याचे लिंगवचनादी व्याकरणधर्म घेते तेव्हा ते घेते पद त्या दुसऱ्या पदाचे विशेषण ठरते. जसे : पांढरा-री–रे–घोडा–गाय–मांजर; येथे 'पांढर' हे विशेषण.

क्रियापद व क्रियाविशेषण यांच्या बाबतीत मात्र हा संबंध रूपदृष्ट्या दाखविता येत नाही. म्हणूनच चिपळूणकरांनी क्रियाविशेषणाचे लक्षण करताना, 'धात्वर्थाशी अन्वित होणारी' या वैशिष्ट्यावर भर दिला आहे. (चिप १३७)

येथे अर्थ म्हणजे पदाचे वाक्यातील कार्य. क्रियाविशेषण असलेला शब्द हा रूपदृष्ट्या सव्यय वा अव्यय अशा कोणत्याही गटात जाईल. त्याचे कार्य महत्त्वाचे. तो म्हणजे धात्वर्थाशी संबंध ठेवणे. तदनुसारच त्यांचा वाक्यातील क्रमही असतो. म्हणूनच क्रिया-विशेषण ही पदजाती नव्हे; ती एक कार्यसंज्ञा आहे. (मंग ९९)

रूपदृष्ट्या अन्वित असणे व अर्थदृष्ट्या अन्वित असणे यांतील फरक लक्षात घेण्यासाठी चिपळूणकरांनीच दिलेले एक उदाहरण पाहू.

'खेकडे उलटे चालतात' येथे 'उलटे' हे पद रूपदृष्ट्या 'खेकडे' या पदाला अनुसरते. तर अर्थदृष्ट्या ते 'चालतात' या क्रियापदाशी अन्वित आहे.

व्याकरणिक पदजाती रूपदृष्ट्या सांगावयाच्या; म्हणून 'उलटे' हे विभक्तिप्रत्ययापेक्षा सव्यय गटात मोडते. कार्यदृष्ट्या ते क्रियापदाशी अन्वित म्हणून क्रियाविशेषण.

(ड २) कर्ता व कर्म : विभक्तिप्रत्यययुक्त शब्दांचा वाक्यातील क्रियापदाशी येणारा संबंध हा कारकसंबंध म्हणून नोंदला जातो. या कारकांपैकी कर्ता व कर्म यांना प्रयोग-दृष्ट्या महत्त्व आहे. या दोहोंच्या व्याख्या करताना रूढ व्याकरणात बरीच चर्चा झाली आहे. परंतु ती बहुतेक त्या शब्दांच्या अर्थाच्या वाटेने जाणारी आहे. व्याकरणात रूप हे प्रथम प्रमाण. तेव्हा त्या दृष्टीने त्यांची लक्षणे सांगता आली पाहिजेत. असा एक प्रयत्न अर्जुनवाडकरांनी केला आहे. ते म्हणतात, 'प्रथम आख्याती क्रियापद ज्याला अनुसरते तो कर्ता' आणि 'जे प्रथमान्त असल्यास ला–प्रत्ययान्ताने व ला–प्रत्ययान्त असल्यास प्रथमान्ताने प्रतिष्ठापनीय ते कर्म.' (अर्जु १६७) ही लक्षणे व्याकरणशास्त्राची मर्यादा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

पाळणारी असल्यामुळे ग्राह्य ठरतात.

परंतु अशा प्रकारच्या लक्षणांची ग्राह्यता मान्य करूनही, ' मला दूध आवडते ' यां-सारख्या रचनांत ' दूध ' हा कर्ता सांगितल्यानंतर ' मला ' हा ' अप्रत्यक्ष कर्ता ' काहीजण सांगतात. ( काळे १२४)

येथील ' आवड ' या धातूप्रमाणेच दिस, शोभ, रुच व ये ( त्याला इंग्रजी येते. ) या धातूंचेही कर्ते व्याकरणात चर्चास्पद झाले आहेत. ( दाम. १४३) असे का व्हावे ? कारण असे दिसते की, या धातूंचा प्रयोग असणाऱ्या वाक्यांतील ' ला ' प्रत्ययान्त पदांचा कारकसंबंध कोणता सांगावा, हा प्रश्न पडतो. कुणी तो अधिकरण सांगतात. (दाम १४३ ) तर कुणी ही ' ला ' प्रत्ययान्त रूपे (संस्कृतातील षष्ठीप्रमाणे ' सामान्यसंबंधबोधक ' मानतात. (अर्जु १६६ ) पदक्रमाच्या अंगाने विचार करून कुणी ' भोक्ता ' हे नवे कारक सांगतात. (केळ २३७ )

मौज अशी आहे की, ' ला ' प्रत्ययान्त रूपाचे नेमके कार्य सांगणे हे दुर्घट आहे. कारण उपर्युक्त धातूंच्या प्रयोगाव्यतिरिक्त असे अन्यही धातू आहेत, जेथे ' ला ' प्रत्ययान्त रूपांचा उपयोग भिन्नभिन्न अर्थच्छटा व्यक्त करणारा भेटतो. जसे : ' मला वजन उचलते ' ' मला गाडी ओढवते ', ' मला हरबरे चावतात ', ' जे जिभेला बरे लागते ते पोटाला बाधते ',' नुस्ती सुपारी खाल्ली, तर त्याला ती लागते, पण ती विड्यात मात्र त्याला हवीच ', ' पोळीशी नुस्ती भाजी असली, तरी मला चालते पण जेवणात शेवटी मात्र काहीतरी गोड मला लागतेच ', ' पुढे गेल्यावर आम्हांला एक तळे लागले. ' इ.

' ला ' प्रत्ययान्त रूपांची अनेकार्थ व्यक्त करू शकणारी ही शक्ती पाहिल्यानंतर ' सामान्यसंबंध ' असा व्यापक कारकार्थ मानण्याकडे कल होतो. कारण अशा अर्थ-च्छटांच्या मागे लागण्यात व्याकरणाला लाभ नाही. ' ला ' प्रत्ययान्त रूपवर्ग एवढे वर्णन त्याला पुरेसे आहे.

येथे एक शंका येते. ' मला दूध आवडते ' यासारख्या वाक्यातील ' ला ' प्रत्ययान्त रूपांना ' सामान्यसंबंध ' या एकाच बासनात गुंडाळण्यापेक्षा ' अप्रत्यक्ष कर्ता ' म्हटले, तर बिघडले कुठे ? प्रश्न बिघडण्याचा नाही. फक्त अडचण एवढीच उरते की, हे तथाकथित कर्ते कोणत्याच आख्यातात प्रथमान्त रूपात भेटत नाहीत. म्हणजे दामल्यांनी दाखविल्या-प्रमाणे या क्रियापदांचा सकर्मक कर्तरी प्रयोग होताना दिसत नाही. ( दाम १४३ ).

प्रयोग हे व्याकरणातील महत्त्वाचे अन्वयसूत्र आहे. त्या दृष्टीने कर्ता व कर्म ही महत्त्वाची पदे. तन्निरपेक्ष अप्रत्यक्ष कर्ता व्याकरणात अकिंचित्कर आहे.

या अप्रत्यक्ष कर्त्यावरून अप्रत्यक्ष कर्माची आठवण येईल. ही कल्पना इंग्रजी व्याकरणा-तील Indirect object वरून आली. जसे : ' पाहुण्यांनी विद्यार्थ्यांना बक्षिसे दिली. ' येथे ' विद्यार्थ्यांना ' हे अप्रत्यक्ष कर्म. येथेही ' बक्षिसे ' हे कर्मच प्रथमेत येऊन कर्मणी प्रयोग होतो. ' विद्यार्थ्यांना ' हे तथाकथित अप्रत्यक्ष कर्म मात्र कोणत्याच आख्यात-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

रचनेत प्रथमेत येणार नाही व तदनुसारी कर्मणी रचना मिळणार नाही. आणि म्हणूनच ही अप्रत्यक्ष कर्माची संकल्पनाही मराठी व्याकरणात मानण्याचे कारण नाही.

(ड ३) प्रयोग : कर्ता, कर्म व क्रियापद यांचा अनन्वय वा अन्वय म्हणजे प्रयोग. (दाम. ६०८)

हे अन्वयसूत्र अर्थातच रूपनिष्ठ आहे. परंतु दामल्यांनी ही रूपनिष्ठता प्रयोगलक्षणात मान्य करूनही ' प्रधानकर्तृक कर्मणी व भावे ' आणि ' समापन कर्मणी व भावे ' असे जे प्रयोगप्रकार सांगितले आहेत, ते चिंत्य आहेत. कारण तेथे व्याकरणाची मर्यादा सुटते. कशी ते थोडक्यात नोंदू. (अधिक विवेचन–विवेक १०५ व १०७)

प्रधानकर्तृक हा भेद दामल्यांनी अर्थावर लक्ष केंद्रित करून केलेला आहे. " ' त्याने काम केले ', हा जरी बाह्यतः कर्मणी प्रयोग दिसला तरी अर्थदृष्ट्या ' त्याने ' या कर्त्याचे महत्त्व कमी होत नाही, म्हणून हा ' प्रधानकर्तृक कर्मणी '–" असे त्यांचे समर्थन आहे. (दाम. ६१५)

प्रयोगलक्षणात कर्ता–कर्म–क्रियापद यांचा रूपदृष्ट्या अन्वय सांगितल्यानंतर प्रयोगप्रकार सांगताना अर्थाला महत्त्व देणे हे वदतो व्याघाताचे आहे. मोडक सांगतात, ' प्रयोग ही संज्ञा रूपप्रधान आहे. कर्ता, कर्म यांच्या अर्थप्रधान कमी-जास्त महत्त्वाशी तिचा काही एक संबंध नाही. ' (मोड २२९)

दामल्यांनी केलेल्या ' समापन ' या भेदाचाही निर्णय याच तत्त्वानुसार करावा लागतो. ' त्याचे पत्र लिहून झाले ' हा दामल्यांचा ' समापन कर्मणी '; तर ' त्याचे निजून झाले ' हा त्यांचा ' समापन भावे. ' (दाम. ६२३ व ६२९). त्यांचे समर्थन असे : " ' त्याच्याकडून पत्र लिहिले गेले ' किंवा ' लिहिण्यात आले ' आणि ' त्याचे पत्र लिहून झाले ' या दोन रचनांमध्ये अर्थाचे सर्वांशी साम्य नाही; तर ' त्याचे पत्र लिहून झाले ' यामध्ये समापनावर (=क्रियासमाप्तीवर) कटाक्ष आहे. म्हणजे क्रियेच्या समाप्तीचा विशेषेकरून निर्देश होत आहे. " (दाम. ६२३)

—असे अर्थावरून जर प्रयोग सांगावयाचे झाले, तर ' बाळ बोलू लागला '—हा कौतुक–कर्तरी व ' बाळ रडू लागला '—हा वैताग–कर्तरी असे प्रकार का सांगू नयेत ? आणि असे अर्थच्छटानुसारी प्रयोगप्रकार अनेक होतील. त्यांचा व्याकरणाला लाभ काय ?

तेव्हा प्रयोग ही केवळ रूपानुसारी पदान्वय व्यवस्था आहे. तेथे ' अर्थ ' आणणे अनावश्यक आहे.

~ येथवर आपण पारंपरिक व्याकरणातील काही समस्यांच्या आधारे व्याकरणातील ' अर्था 'चा अर्थ व त्याची मर्यादा लक्षात घेण्याचा जो प्रयत्न केला, त्यावरून एवढेच म्हणता येईल की, व्याकरणाचा मुख्य भार रूपविमर्शावर आहे. अर्थविमर्श हे काम अन्य शास्त्राचे. आवश्यक तेथे अर्थाचे साहाय्य घेतले जाईल; परंतु पदाचे व्याकरणधर्म त्यावरून ठरणार नाहीत.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

म्हणूनच शंकराचार्यांच्या सुरात सूर मिसळून 'तर्कोऽप्रतिष्ठः' प्रमाणे 'अर्थोऽप्रतिष्ठः' असे काही व्याकरण म्हणणार नाही. मात्र शाकुंतलातील काश्यपाचे अनुकरण करून 'अर्थो हि अर्थः परकीय एव।' एवढेच ते म्हणेल.

—पण शेवटी हेही रूपक फार ताणणे बरे नव्हे. कारण 'तुटेपर्यंत ताणू नये' हा हा न्याय रूपकाला सर्वांत जास्त लागू पडतो.

## संक्षेपाचे विवरण


अर्जु– मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद—
कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर ( १९८७ )

आग– वाक्यमीमांसा आणि वाक्यांचे पृथक्करण– गोपाळ गणेश आगरकर. ( १८८८ ) आगरकर वाङ्मय खंड ३– संपादक– म. गं. नातू, दि. य. देशपांडे (१९८६) मध्ये संग्रहीत.

काळे– 'वाक्यविन्यास'– कल्याण काळे.
–'वर्णनात्मक भाषाविज्ञान–स्वरूप आणि पद्धती' संपादक– डॉ. कल्याण वासुदेव काळे व डॉ. अंजली अरुण सोमण. ( १९८२ )मध्ये संग्रहीत.

केळ– वैखरी– डॉ. अशोक रा. केळकर ( १९८३ )

गुंजी - कै. रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख. प्रथम भाग. संपादक– काशीनाथ रामचंद्र गुंजीकर (१९४२)

चिप– मराठी व्याकरणावर निबंध– कृष्णशास्त्री चिपळूणकर दु. आ. ( १९७१ )

जोशी– प्रौढबोध मराठी व्याकरण– रामचंद्र भिकाजी जोशी ( १८८९ )

दाम– शास्त्रीय मराठी व्याकरण– मोरो केशव दामले, अर्जुनवाडकर संपादित मुद्रावृत्ती ( १९७० )

दीक्षि– भारतीय तत्त्वज्ञान– प्रा. श्री. ह. दीक्षित तृतीयावृत्ती ( १९७३ )

मंग– मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार– अरविंद मंगरूळकर
पुनर्मुद्रित आवृत्ती (१९७८)

मंग-अर्जु– मराठी : घटना, रचना, परंपरा– अरविंद मंगरूळकर व कृ. श्री. अर्जुनवाडकर ( १९५८ )

मोड– मराठीचे अंतरंगदर्शन– गोविंद कृष्ण मोडक ( १९३२ )

विवेक– मराठी व्याकरण विवेक– मा. ना. आचार्य ( १९९० )



मु. व पोस्ट–चौल, ता. अलिबाग, जि. रायगड. ४०२२०३










अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

मराठी अभ्यास परिषद

# वर्ष ८, १९९० ची सूची

## लेखक सूची





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद
अनुक्रमणिका

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

सोहोनी श्री. वा. । कालिदास आणि लिपी व अध्ययन । अनुवाद : कल्याण काळे । ८ : ३ : ३२

## लेख सूची





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक ' मराठी अभ्यास परिषद ' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्या-तरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी ( सभासद वर्गणी भरून ) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला ( मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो ) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ ( १९८३ ) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ ( १९८४ ) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. ( परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु. ); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. ( आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही. )

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातींसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद

अनुक्रमणिका

नोंदणी क्रमांक 040048/83

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

### विज्ञानावरील प्रकाशने

| अ. क्र. | प्रकाशनाचे नाव | लेखक / अनुवाद | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १) | रेडिओ दुरुस्ती | श्री. श्री. वि. सोहोनी | ५२ |
| २) | रेकॉर्ड प्लेअर | ,, | ११-५० |
| ३) | डिझेल एंजिन | प्रा. सुभाष सावरकर | १५ |
| ४) | अणुयुग | श्री. वि. त्र्यं. आठवले | १२ |
| ५) | पुस्तक बांधणी | श्री. वि. ना. लिमये | १८ |
| ६) | खनिज तेल व तज्जन्य रसायने | श्री. प. म. बर्वे | १६ |
| ७) | ध्वनिवर्धन आणि वितरण व्यवस्था | श्री. श्री. वि. सोहोनी | २२ |
| ८) | तेले व मेदे भाग १ | डॉ. न. गं. मगर | १९ |
| ९) | वनश्रीसृष्टी भाग १ व २ | डॉ. न. वि. आपटे | प्रत्येकी १० |
| १०) | भौतिकी मानवशास्त्र | श्री. वि. श्री. कुलकर्णी | ३३ |
| ११) | कापडावरील रासायनिक प्रक्रिया | डॉ. रा. शं. भागवत | १८ |
| १२) | बहुरुपी बहुगुणी कार्बन | डॉ. रा. चं. जोशी | १४ |
| १३) | सैद्धान्तिक मृत्तिका बलविज्ञान (श्री. तेरेगाझी लिखित "Theorctical Soil Mechanics" या पुस्तकाचा अनुवाद.) | श्री. श. म. भालेराव | ४२ |

**साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने खालील केंद्रांवर मिळतील :**

१. प्रकाशन व्यवस्थापक, शासन मुद्रण व लेखन सामग्री विभाग चर्नी रोड, मुंबई ४०० ००४

२. व्यवस्थापक, शासन लेखन सामग्री आणि ग्रंथागार, शहागंज, गांधी चौक, औरंगाबाद ४३१ ००१

३. व्यवस्थापक, शासकीय ग्रंथागार, बडवे बिल्डिंग, पी. वाय्. सी. जिमखाना, पुणे ४११ ००४

४. व्यवस्थापक, शासन मुद्रण व ग्रंथागार, सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
मराठी अभ्यास परिषद